

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक नववा

# नवभारत

जून
१९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ' नवभारत ', जून १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**डॉ. गो. अ. भागवत** एम्. डी., बी.एस्सी—येरवड्याच्या मेंटल हॉस्पिटलचे सुपरिंटेंडेंट, पुणें येथील बी. जे. मेडिकल कॉलेजमध्यें मानसशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. श्रीपाद जोशी,** ( पुणें )—उर्दू, हिन्दी, गुजराती साहित्याचे अनुवादक. ' उर्दू के अदीब ' ' —आणि माणसाचा मुडदा पडला ! ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. दुर्गा भागवत** एम्. ए., ( मुंबई )—समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, डॉ. केतकर यांचें वाङ्मय यांवर यांचा विशेष व्यासंग असून, त्यांनीं ' राजारामशास्त्री भागवत यांचें चरित्र ', ' Romance in Pali Folklore ' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत.

**श्री. वा. मु. लिमये** एम्. ए., एल्एल्. बी., ( मुंबई )—घटनाशास्त्र, घटना-कायदा, समाजशास्त्र, या विषयांचे व्यासंगी अभ्यासक.

**डॉ. रा. चिं. श्रीखंडे** एम्. बी. बी. एस्. ( कोल्हापूर )—' वाङ्मयश्रीखण्ड ', ' सुश्लोककुमार ', ' सुश्लोकमेघ ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**श्री. अ. मा. सगणे**—उमरावती येथील विदर्भ महाविद्यालयांत उच्च पदवीकरितां विद्यार्थी.

**श्री. वसंत वऱ्हाडपांडे,** बी. ए., ( नागपूर )—यांच्या कविता नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**प्रा. ग. प्र. प्रधान** ( पुणें )—फर्ग्युसन कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादकमंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंहि सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा, विनाश न होतां, विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. गो. अ. भागवत

# म नो वि ज्ञा न

इंग्रजींत Psychology ह्या शब्दानें संबोधिल्या जाणाऱ्या विषयास 'मानसशास्त्र' हें नांव रूढ झालेलें आहे. परंतु Psychology ह्या शब्दाचा अर्थ व व्याप्ति वेळोवेळीं बदलत गेल्यानें अलीकडील ह्या विषयावरील इंग्रजी व इतर आधुनिक भाषांत तो शब्द Scientific Psychology म्हणजे "मनोविज्ञान" ह्या अर्थानेंच योजिला जातो. आपल्याकडील 'मानसशास्त्र' ह्या सदराखालीं प्रसिद्ध होणारे लेख व ग्रंथ ह्यांची 'वैज्ञानिक' दृष्टिकोन व संशोधन-पद्धति ह्यांपासून पूर्ण फारकत असल्यानें प्रस्तुत लेखकाच्या मतें "मानसशास्त्र" हा शब्द 'विज्ञानपूर्व' मानसिक व्यापारांच्या ज्ञानपद्धतीला लावणें व वैज्ञानिक मानसिक ज्ञानास "मनोविज्ञान" ही संज्ञा लावणें जास्त सयुक्तिक ठरेल असें वाटतें. 'शास्त्र' या शब्दाचा अर्थ ज्ञानाची पद्धतशीर मांडणी ( Systematization of Knowledge ) व विज्ञान म्हणजे ज्ञानाची शास्त्रशुद्ध मांडणी ( Scientific Formulation of Knowledge ) असा भेद करणें बरोबर होईल.

आपल्याकडे प्रसिद्ध झालेलें "मानसशास्त्रा" वरील लिखाण, प्रचलित विश्वविद्यालयीन "अवैज्ञानिक" पद्धतीचें मानसशास्त्राचें अध्ययन व अध्यापन, त्यावर आधारलेले भ्रामक, विपर्यस्त, वाङ्मयीन व शैक्षणिक विचार ह्या सर्व परिस्थितीकडे पाहिलें म्हणजे प्रस्तुत लेखकाप्रमाणें विचारक्षम जनतेला प्रस्तुत 'मनोविज्ञाना'च्या आवश्यकतेची जाणीव होईल. मराठी वाङ्मयांत तर 'वैज्ञानिक' पद्धतीचें दालन जवळजवळ रिकामेंच आहे व म्हणूनच हा लेख मराठींत लिहिण्याचें लेखकानें ठरविलें आहे.

## ज्ञानार्जनाच्या पद्धती

प्रारंभीं "विज्ञान" ( Science ) ह्या संज्ञेचा अर्थ विशद करणें जरूरीचें आहे. हा शब्द दोन निरनिराळ्या अर्थी योजिला जातो—( १ ) विश्वविषयक ज्ञानाची कोणतीहि एक शाखा ( sector of Universal knowledge ), ( २ ) ह्या शाखांतील ज्ञानार्जनाचा मार्ग किंवा पद्धति ( Methodology of this knowledge ). वरील दोहोंपैकीं दुसरा अर्थ "विज्ञाना"चें इतरांपासून खास वैशिष्ट्यदर्शक असल्यानें प्रस्तुत लेखांत विज्ञान हा शब्द 'विशिष्ट ज्ञानार्जनपद्धति' ह्या दृष्टीनें योजिला आहे.

ज्ञानार्जनाचे अनेक मार्ग आहेत व ऐतिहासिक दृष्टीनें त्यांचें अवलोकन केलें तर त्यांची वर्गवारी पुढीलप्रमाणें करतां येईल : ( १ ) आधिदैविक पद्धति : ही पद्धति ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत पुरातन आहे. व ह्या पद्धतींत धार्मिक ( Religious, deistic, supernatural ), गूढ किंवा रहस्यमय (mystic) व आत्मिक ( spiritual or "Psychic" ) इत्यादी पद्धतींचा समावेश करतां येईल. विश्वाचे व तदंतर्गत मानवाचे व्यापार निसर्गापलीकडील कांहीं दैवी शक्तीकडून किंवा तिच्या प्रेषिताकडून घडविले जातात, वैयक्तिक स्फूर्ति ( Intuition ) ही नैसर्गिक कार्यकारणसिद्धान्ताच्या पलीकडे आहे व ह्यामधील सिद्धान्तांना वैयक्तिक अनुभवापलीकडे इतर पडताळ्याची आवश्यकता नाहीं, इत्यादि कल्पनांवर ही पद्धति आधारलेली आहे. मानवी समाजाच्या एका युगांत ही पद्धति विशेष प्रचलित व प्रभावी होती पण ती पुढें निष्प्रभ ठरली. अर्थात् त्याचे अवशेष अजूनहि




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रचलित असून त्याचें महत्त्व साधारणतः संस्कृतीच्या प्रगतीशीं व्यस्त प्रमाणांत दिसून येतें. ह्या पद्धतीला तर्काची जरूरी असूं शकत नाहीं. व या पद्धतीचा पाया व उभारणी निव्वळ भावनेवर असतात. (२) तत्त्वज्ञान-पद्धति ( philosophic methodology ) ही पद्धति मुख्यतः तर्का-( Logic )-वर आधारलेली आहे. व हा तर्क भाषेवर अतएव संज्ञात्मक प्रतीक-( symbolic )पद्धतीवर अवलंबून असतो. ह्यांत सत्यसृष्टींतील प्रायोगिक पद्धती ( experimental verification or validation )-ची जरूरी नसते. केवळ वैयक्तिक मतें, वैयक्तिक कल्पना, अनुभव, विचार ह्यांवर आधारल्यामुळें त्यांतील सिद्धान्ताचा व्यावहारिक, सामाजिक व्यापारांत कांहींहि उपयोग असूं शकत नाहीं, व त्यामुळें समाजाला तो बहुतांशीं कुचकामाचा ठरतो. अशा कारणानेंच ही पद्धति कालांतरानें निष्प्रभ ठरली. वरील दोनहि पद्धती अशा रीतीनें समाजविकासाला अव्यवहार्य ठरल्यामुळें त्या दोन्हींचा प्रस्तुत लेखकाच्या मतें विज्ञानपूर्व पद्धती ( prescientific methodologies ) ह्या व्यापक संज्ञेखालीं निर्देश करणें सयुक्तिक ठरेल. (३) वैज्ञानिक पद्धति ( scientific methodology). ही ऐतिहासिक दृष्ट्या बरीच आधुनिक आहे. ह्या पद्धतींत निरीक्षणाला प्राधान्य दिलें जातें व निरीक्षित आविष्कारांतील कार्यकारणसंबंध किंवा इतर संबंध ( Causal or associational relationship of observed phenomena ) ह्या बद्दलचे सिद्धांत प्रायोगिक किंवा ऐतिहासिक दृष्ट्या आलेल्या प्रचीतीनंतरच ग्राह्य समजले जातात. तसेंच ह्यांतील सिद्धान्त व्यक्तिनिष्ठ नसून ते व्यक्तिनिरपेक्ष ( impersonal ) असतात व त्यांचें क्षेत्र भौतिक, रासायनिक व जीवात्मक अशा सर्व प्रकारच्या आविष्कारावर आधारलेलें असल्यानें ते प्रचलित समाजाच्या प्रगतीला व विकासाला परिपोषक व मार्गदर्शक ठरतात. अशा सर्वव्यापी व सर्वगामी पद्धतीचा आपल्या विश्वविद्यालयीन व सामान्य वाङ्मयांत अभाव असल्यानें आपली स्थिति मागसलेली आहे हें कोणीहि विचारवंत मनुष्य मान्य करील. तसेंच ह्या पद्धतीचा अवलंब केल्याशिवाय आपली प्रगति होणें अशक्य आहे, हें स्वयंसिद्ध आहे.

### पहिल्या दोन पद्धतींतील भ्रामक तत्त्वें

वर निर्दिष्ट केलेल्या पद्धतींचा प्रभाव मनोव्यापारांच्या ज्ञानार्जनांत ऐतिहासिक दृष्ट्या कितपत होत गेला हें पाहणें क्रमप्राप्त आहे. प्रथमावस्थेंत, मन किंवा आत्मा ( Psyche or Soul ) ही वस्तु शरीरापासून पूर्णपणें निराळी असून तिचे व्यापार 'ईश्वर'-नियंत्रित आहेत, व शरीराच्या व्यापारापेक्षां ते भिन्न व उच्च दर्जाचे आहेत, अशा कल्पनांवर बहुतेक सर्व प्राथमिक 'मानसशास्त्रा'ची उभारणी झाली आहे. आपल्याकडील प्राचीन व अर्वाचीन वाङ्मयांत संबोधिलेलें भारतीय, हिंदु किंवा पौर्वात्य मानसशास्त्र हें बहुशः अशा थाटाचें आहे व त्यांतील अशा प्रकारच्या सिद्धांतांना आधुनिक मनोविज्ञान अगर (तत्त्वज्ञाननिष्ठ) मानसशास्त्र या पद्धतीनें काढलेल्या निष्कर्षाचा आधार देण्याची प्रचलित पद्धति किती सदोष व अग्राह्य आहे हें सहज समजून येईल. अशा प्रकारचें लिखाण व योगशास्त्रावरील प्रचलित लिखाण आपल्याकडे इतकें पसरलेलें आहे कीं, त्याचें वैज्ञानिक मूल्यमापन करणें अगत्याचें झालें आहे. प्रायोगिक प्रचीतीचा पूर्णपणें अभाव, ह्या एका मुद्द्यावर हें सर्व लिखाण फोल ठरतें. त्यानंतरचे प्रयत्न तत्त्वज्ञान्यांकडून केले गेले. पाश्चिमात्य व पौर्वात्य देशांतून सुमारें दोन हजार वर्षांपासून आजपर्यंत अनेक नामांकित विद्वानांकडून अशा प्रकारचे अनेक विचार व विचारपंथ अस्तित्वांत आले आहेत. त्यांच्या मुळाशीं असलेलीं भ्रामक तत्त्वें पुढीलप्रमाणें दिसून येतात: (१) 'मन' व 'शरीर' ह्या दोन भिन्न वस्तू ( entities ) आहेत. (२) शरीराच्या व्यापारावर मनाचे व्यापार अवलंबून नाहींत. (३) मनाचे व्यापार समजण्यास शरीराची व मुख्यतः मेंदूची रचना समजण्याची आवश्यकता नाहीं. (४) मनाचे अंतर्मुख विचार, कल्पना व भावना (Subjective thinking, ideation and feeling) ह्यांमधील भाषिक तर्कसंगति (linguistic logic) येवढ्या आधारावर व येवढ्याच भांडवलावर मानसशास्त्राची सर्वांगीण उभारणी करतां येईल. (५) त्याला वैज्ञानिक पद्धतीची आवश्यकता नाहीं. (६) शारीरिक व मानसिक विकृतीमुळें उद्भवणारे मानसिक रोग व त्यांची उपचारपद्धति ह्यांपासून निष्पन्न झालेल्या ज्ञानाचा मानसशास्त्राला फारसा उपयोग नाहीं—अशा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व एतत्सदृश कल्पनांमुळें व संशोधन-पद्धतीमुळें तत्त्वज्ञान्यांचे वेगवेगळे विचार व मतें जनतेपुढें ठेवण्यांत आलीं व त्यांच्या पुष्कळ परस्परविरोधी सिद्धान्तांचा पुरस्कार फारसा बोधकारक ठरला नाहीं. त्यामुळें विचारांचें अराजक माजलें. अशा मतांचा समाजांतील प्राकृत (normal) व विकृत (abnormal) व्यक्तींना, मार्गदर्शन अगर उपचार ह्या कामीं बिलकुल उपयोग न झाल्यानें हें तत्त्वज्ञानी 'मानसशास्त्र' कुचकामीं ठरलें !

वर निवेदिलेल्या निष्प्रभ व अव्यवहार्य विज्ञानपूर्व पद्धती सोडून विज्ञानपद्धतीवर आधारलेल्या 'मनोविज्ञाना' कडे वळण्यापूर्वी कांहीं प्रस्तुत अपसिद्धांतांचा परामर्श घेणें जरूरीचें आहे : (१) वैज्ञानिकपद्धति ही प्रादेशिक (Regional) असूं शकत नाहीं. म्हणून प्रचलित लिखाणामध्यें आढळून येणारे 'पौर्वात्य' मानसशास्त्र, 'पाश्चिमात्य' मानसशास्त्र, 'भारतीय' मानसशास्त्र इत्यादि वर्गीकरण सर्वथा अज्ञानमूलक आहे. (२) वैज्ञानिक चर्चेत सिद्धान्ताच्या सत्यासत्यतेचा विचार करीत असतां 'व्यक्तिमाहात्म्या' ला संपूर्ण फांटा द्यावयाचा असतो. व्यक्तिमाहात्म्याला प्रचारदृष्टीनें किंवा ऐतिहासिक कथनांत, लेखनांत व भाषणांत स्थान असूं शकेल; वैज्ञानिक चर्चेत नाहीं. (३) पूर्वग्रह व भावनाशील विचारसरणी ह्यांना वैज्ञानिक पद्धतींत थारा नसतो. (४) विज्ञान हें प्रगमनशील असल्यानें पूर्वकालीन ग्रंथांचा आधार फारसा उपयोगी पडत नाहीं. दोन हजार वर्षांपूर्वी अमुक व्यक्तीनें असें लिहिलें आहे, ५० वर्षांपूर्वी तमुक वैज्ञानिक असें प्रतिपादीत होता अशा प्रकारच्या विधानांना केवळ भ्रामक व भावनामय किंमत असूं शकते.

## मनोविज्ञानाचे दोन मूलभूत सिद्धान्त

वरील विवेचनानंतर 'मनोविज्ञान' ह्या विज्ञानविषयाची व्याख्या, व्याप्ति व वैशिष्ट्य ह्यांसंबंधीं विवेचन करणें योग्य होईल. आरंभींच एक गोष्ट नमूद करणें आवश्यक आहे व ती म्हणजे मनोविज्ञान 'मन' व 'शरीर' ह्या भिन्न व स्वतंत्र वस्तू आहेत असें मानीत नाहीं. शरीरांतील एका विशिष्ट संस्थे- (system) वर, ज्याला आपण 'मन' किंवा 'मनोव्यापार' म्हणतो ते सर्वथैव अवलंबून असतात. ह्या मज्जासंस्थे—(nervous system) च्या अत्यंत गुंतागुंतीच्या व उत्क्रांत व्यापारांना शाब्दिक सोयीकरितां आपण 'मानसिक व्यापार' किंवा जास्त सुटसुटीत "मन" असें संबोधितों, इतकेंच.

वरील मूलभूत सिद्धान्ताला अत्यंत समर्पक पुरावा म्हणजे ह्या मज्जासंस्थेच्या अभावीं कोणत्याहि प्राण्याचे मनोव्यापार चालूं शकत असल्याचें अजूनपर्यंत कोणीहि सिद्ध करूं शकलें नाहीं. येथें एका विशिष्ट मतप्रणालीचा निर्देश करणें आवश्यक आहे. सुमारें ६०–७० वर्षांपूर्वी कांहीं विद्वान् व्यक्तींनीं, मन व शरीर स्वतंत्र असून मनाचे व्यापार हे शारीरिक व्यापारांवर अवलंबून नसून त्यांचे मार्ग स्वतंत्र आहेत, व ते भौतिक सिद्धांताबरहुकूम चालत नसून त्यांच्या क्रिया स्वतंत्रनियमानुसार चालतात, असें प्रतिपादिलें असून "विदेही आत्म्यांचे संदेश" "असंज्ञेय ज्ञान" (Extra-sensory perception), 'सुदूर प्रक्रिया' (Telepathy, Tele-kinesis, Clairvoyance) इत्यादि आविष्कारांच्या आधारावर एक स्वतंत्र "विदेहमानसशास्त्र" (Para-psychology, meta-psychologique) स्थापण्याचा प्रयत्न केला आहे, त्याच्या पुष्ट्यर्थ अनेक संख्याशास्त्रीय व प्रायोगिक उदाहरणें पुढें आणून त्याची सिद्धता दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थातच ह्या विषयींचा विचार स्वतंत्र करणें इष्ट आहे. पण येथें इतकें दर्शविलें तर पुरें होईल कीं, वर निर्देशिलेल्या मूलसिद्धान्तावर हें शास्त्र रचलें नसल्यानें त्याचें अवैज्ञानिक स्वरूप आपोआपच सिद्ध होतें. "विज्ञानाच्या" नांवाखालीं ह्या शास्त्राचे अनेक आधुनिक लेखक जेव्हां आपले विचार मिरविण्याचा प्रयत्न करतात, त्या वेळीं त्यांचें खरें अवैज्ञानिक स्वरूप स्पष्ट करणें भाग पडतें. आतां आपण ज्याअर्थीं 'मन' व 'शरीर' ही अविभक्त (indivisible) मानतों, त्या अर्थीं मनोविज्ञान हें जीवशास्त्रा-(Biology) चें एक अंग आहे असें गृहीत धरणें प्राप्त आहे. मनोविज्ञानाचा पाया जीवशास्त्राच्या प्रयोगसिद्ध सिद्धान्तावर व "जीवा" च्या उत्क्रमणवादावर अधिष्ठित असणें हेंहि क्रमप्राप्तच आहे. तात्पर्य, मनोविज्ञानाचा साद्यंत इतिहास व विकास हा मुख्यत्वें 'मज्जासंस्थे'चा इतिहास व विकास होय.

आतां मज्जासंस्थेचें कार्य काय तें पाहूं. मूलतः



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मज्जासंस्थेचें कार्य बाह्य व अंतःस्थ आवरणां-(environment) मधील फरकां-(variation)-चें ज्ञान जीवा-( organism ) ला करून देऊन तदनुरूप कृती अगर फेरफार घडवून आणून जीवाला कार्यक्षम करणें हें होय. जसजसें अंतर्गत व बाह्य आवरण कालांतरानें उत्तरोत्तर जास्त क्लिष्ट किंवा गुंतागुंतीचें ( complex ) होत गेलें तसतशी ह्या मज्जासंस्थेच्या रचनेंत व व्यापारांत तदनुरूप अशी क्लिष्टता येत गेली. ह्याचा अर्थ एवढाच कीं ज्याला आपण 'मन' किंवा 'मनोव्यापार' संबोधितों, ती एक 'अन्योन्यक्रिया' ( Inter-action ) आहे व त्याचें समीकरण असें मांडतां येईल :

मज्जासंस्था → आवरण ( अंतःस्थ व बाह्य ).
←

मनोविज्ञानाचा हा दुसरा मूलभूत सिद्धान्त मानिला पाहिजे.

वरील समीकरणाच्या दोन्ही बाजूंचा उत्क्रांतीच्या क्रमांत उत्तरोत्तर विकास होत जाऊन 'मानवा'च्या बाबतींत त्याची क्लिष्टता अत्यंत परमावधीस पोंचली आहे. ह्यामुळेंच विज्ञानाच्या श्रेणींत ह्या शाखेची प्रगति व परिपक्वता अजूनहि प्रथमावस्थेंतच असलेली आढळून येते.

## मनोविज्ञानाला इतर विज्ञानांचें अधिष्ठान

उपर्युक्त मूलभूत सिद्धान्तापासून अनेक उपसिद्धान्त सुस्पष्ट होतातः ( १ ) मनोविज्ञानाच्या अभ्यासकाला मज्जासंस्थेची रचना, तिचें आद्यजीवापासून मानवापर्यंत झालेलें उत्क्रमण इत्यादि गोष्टींचें प्रायोगिक व वैकासिक ( evolutionary ) ज्ञान संपादन करून घेणें अत्यंत आवश्यक आहे, व त्या गोष्टीकडे आपल्या शिक्षणसंस्था व विश्वविद्यालयें ह्यांचें लक्ष जाणें जरूरीचें आहे. ( २ ) समीकरणाची दुसरी बाजूः --(अ) अंतःस्थ आवरण ( Internal Environment ) ह्याचीहि वाढ जीवोत्क्रमणा-( Organic Evolution ) मध्यें मानवापर्यंत कशी होत गेली, त्याला मूलभूत असणारा, जीवनाची रचना व व्यापार, यांचा विकास कसा होत गेला त्याची माहिती व ज्ञान ह्याविषयींचा अभ्यास आवश्यक आहे. ह्या बाबतींत 'मानसशास्त्रा'ची अक्षम्य व संपूर्ण हेळसांड सध्यां दिसून येत आहे. ( ब ) बाह्य आवरणा-( External Environment )च्या उत्क्रांतिदृष्ट्या दोन अवस्था कल्पितां येतील. प्रथम अवस्थेंत सर्वजीवसाधारण प्राथमिक असें भौतिक-रासायनिक ( Physico-Chemical ) आवरण व दुसरें उच्चश्रेणींतील जीवांचें, मानव व तत्सम प्राण्याचे बाबतींत, अत्यंत महत्त्वाचें असें सामाजिक( social ) आवरण. ह्या आवरणाचा अभ्यास सांस्कृतिक मानवविज्ञान ( Cultural Anthropology ) व समाजविज्ञान ( Sociology ) – Socialism नव्हे— ह्या विज्ञानशाखांच्या सहकार्यानें केला जातो. ह्या दोन्ही शाखांचा वैज्ञानिक पद्धतीनें आवश्यक असा –मानवी जीवनाचा व समाजसंस्थेचा–अभ्यास व संशोधन आपल्याकडे जवळजवळ मुळींच उपलब्ध नाहीं असें खेदानें नमूद करावें लागतें. त्याचें कारण मुख्यतः ह्या विषयांतील अभ्यासकांना जरूर असलेल्या वैज्ञानिक अभ्यासाच्या पार्श्वभूमीचा संपूर्ण अभाव हें असावें असें वाटतें.

मनुष्याचें व्यक्तिमत्त्व (Personality) व त्याचे मनोव्यापार अनेक अन्योन्यक्रियांमुळें परिणत होत असतात. त्यावरून आणखी एक उपसिद्धान्त प्रस्थापित होतो : (३) मनोविज्ञानाचा अभ्यास हा सापेक्ष आहे. ह्याची जाणीव ह्या विषयावर लिहिणाऱ्या बहुतेक व्यक्तींना नसते. मानवी व्यक्तिमत्त्व व मनोव्यापार ह्यांची वाढ व विकास नुसत्या पोकळी-(Vacuum)-मध्यें होत नाहीं व तीं सर्वथैव व्यक्तिगत नसतात. ह्या उपसिद्धान्ताचें महत्त्व आपल्याकडील शैक्षणिक मानसशास्त्राच्या अध्यापकांना समजलेलें दिसत नाहीं. अत्यंत प्राथमिक अशा प्रायोगिक मानसशास्त्राच्या तुटपुंज्या भांडवलावर सामाजिक व सांस्कृतिक आवरणांत विकास पावलेल्या विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल अधिकृत सिद्धान्त मांडणें हें अत्यंत धाडसीपणाचें, अव्यवहार्य व विज्ञानाभावाचें लक्षण आहे. अशाच प्रकारचे धाडसी अल्पसिद्धान्त कांहीं प्रसिद्ध गणिती व भौतिक शास्त्रज्ञ पाश्चिमात्य देशांतहि मांडतात ही गोष्ट मशहूर आहे.

वरील विवेचनावरून मनोविज्ञानाच्या अभ्यासकाला पुढील विज्ञानशास्त्रांच्या सखोल व मूलभूत ज्ञानाची व वैज्ञानिक पद्धतीची संपूर्ण जाणीव असणें आवश्यक आहे हें दिसून येईल : (१) जीवशास्त्र व त्याचीं



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

उपांगें--विकासवाद (Evolution), तौलनिक व मानवी शारीर (Comparative and human Anatomy), तौलनिक व मानवी व्यापारविज्ञान (Physiology), विशेषतः त्यांतील मज्जासंस्थेचें उत्क्रमण. (२) भौतिक (Physics) व रासायनिक (Chemistry) विज्ञान, विशेषतः त्यांतील जीव-विषयक उपांगें (Biophysics & Biochemistry) (३) सांस्कृतिक मानव-व समाजविज्ञान.

वरील तीन प्रकारच्या विज्ञानशाखांच्या अन्योन्य साहचर्यावर व संघटने—(integration)वर मनोविज्ञान हें आधारलेलें असल्यानें त्यांच्या अध्ययन—अध्यापनाकरितां एक स्वतंत्र केंद्रीय संस्था असणें आवश्यक आहे व या संस्थेंत मनोविज्ञानाचा वर दर्शविलेल्या अंगभूत विज्ञानशाखांबरोबर योग्य असा समन्वय करून संशोधन करणें सुकर होईल. अशा भक्कम पायावर उभारलेलें मनोविज्ञान हें इतर व्यावहारिक (applied) मनोविज्ञान व विकृत मनोविज्ञान (Psychiatry), शैक्षणिक व औद्योगिक इत्यादि उपांगांना अधिक मार्गदर्शक होईल ह्यांत शंका नाहीं. समाजाची व व्यक्तीची प्रगति होण्यास अशी केंद्रीय संस्था प्रचलित विज्ञानपूर्व पद्धतींपेक्षां अधिक मार्गदर्शक व उपयुक्त ठरेल ह्यांत शंका नाहीं.

## मनोविज्ञानाच्या विकासाचा इतिहास

अशा प्रकारें मनोविज्ञानाची भूमिका, व्याप्ति, विस्तार, अभ्यासपद्धति, सामाजिक व वैयक्तिक महत्त्व इत्यादि दृष्टींनीं विवेचन केल्यानंतर ह्या विषयाची ऐतिहासिक दृष्ट्या प्रगति कशी होत गेली ह्याचें अवलोकन करणें उचित होईल.

स्थूलमानानें मनोविज्ञानाच्या विकासाच्या इतिहासांतील उत्क्रांतीचे टप्पे पुढीलप्रमाणें वर्णितां येतील : (१) १८६० च्या सुमारास संवेदना व त्यांचें भौतिक मापन (Physical Measurement) हें फेक्नर व वेबर ह्या दोन भौतिक शरीरव्यापारवैज्ञानिकांनीं करण्यास सुरुवात केली व अशा पद्धतीनें तत्त्वज्ञानी मानसशास्त्राचें 'मनोविज्ञाना'च्या रूपानें क्रान्तिकारक स्थित्यंतर घडवून आणलें. (२) वुंड ह्यानें आपल्या प्रायोगिक मनोविज्ञानशालेंत मानव व इतर प्राण्यांवरील संशोधनास सुरुवात केली (१८७९). पुढें त्याच्या अनेक नामवंत शिष्यांनीं संशोधनांत भर घातली. त्यामुळें मनोविज्ञानाची जीवशास्त्रावरील आधारलेली भूमिका (Biological foundation) सुस्पष्ट होत गेली. (३) मानसिक क्रियांची अंतर्गत सुसंबद्धता व त्यांची नैसर्गिक प्रवृत्ति (nistincts) व भावनाविग्रह यांवरील प्रतिक्रिया ह्या महत्त्वाच्या मुद्दयांचें प्राकृत (normal) व विकृत (abnormal) मानसिक व्यापारांत दिसून येणारें महत्त्व फ्रॉईड ह्या मनोवैज्ञानिकानें ओळखलें. व त्यावर आधारलेल्या मनोविश्लेषणानें मानसिक रोगांचें निदान करणें, त्यांवर उपचार करणें या (diagnostic and therapeutic) पद्धतींच्या संशोधनाचें कार्य त्यानें १८८५ पासून सुरू केलें. (४) केंद्रित मज्जासंस्थेच्या अनुवर्तित क्रियां-(conditioned reflex)चें संशोधन व त्यांचें शरीरव्यापार व मनोविज्ञान या विषयांमध्यें असणारें महत्त्व पटवून देण्याचें श्रेय दोघां रशियन वैज्ञानिकांकडे—पॅव्हलॉव्ह (Pavlov) व बेक्टेरेव्ह (Bechterev) यांजकडे आहे (१९१४-१६). आपल्या संवयी, शिक्षण, बुद्धिविकास, एकंदर जन्मोत्तर व्यापारांचें वैचित्र्य व विविधता ह्या सर्वांच्या मुळाशीं ह्या क्रिया असल्यामुळें त्यांचें महत्त्व फार आहे. (५) आपल्या बाह्य आवरणांतील सामाजिक घटकांचें व्यक्तिविकासामध्यें, सामाजिक व्यवहारामध्यें, व मनोविकृती-(mental disorder)च्या क्षेत्रांत महत्त्व पहिल्यानें पटवून देण्याचें श्रेय अमेरिकन समाजवैज्ञानिक रॉस्, बर्नार्ड इत्यादिकांना आहे (१९२४). तसेंच सांस्कृतिक घटकां-(Cultural Components)चें महत्त्व लिंटन इत्यादि, मानवसंस्कृति विज्ञाना-(Cultural Anthropology)च्या क्षेत्रांतील वैज्ञानिकांना दिलें पाहिजे.

वर निर्देशिलेले पांच टप्पे जरी मूलभूत असले तरी इतर आनुषंगिक, व संबद्ध विज्ञानविभागांतील संशोधन व प्रगति यांचे परिणाम मनोविज्ञानाच्या प्रगतीला व प्रचलित स्थितीला कारणीभूत झाले आहेत, हें विसरून चालणार नाहीं. उदाहरणार्थ—शरीरव्यापार (Physiology), वैद्यक (Medicine), शरीरविकृति (Pathology), मनोविकृति (Psychiatry), पदार्थविज्ञान व रसायन इत्यादिकांमधील संशोधन. ह्या सर्वांचें सविस्तर व सांगोपांग विवेचन येथें करतां येत नाहीं.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

वरील विवेचनावरून मनोविज्ञान हें एका मोठ्या वृक्षाप्रमाणें दिसून येतें. त्याचीं मुळें जशीं विस्तृत व अनेक मूलभूत विज्ञानांपर्यंत भिडलेलीं आहेत तशाच त्याच्या बहुविध शाखा निरनिराळ्या दिशांना प्रसृत झालेल्या आहेत. येवढ्याकरितां ह्या विषयाच्या संशोधनाला अनेक मूलभूत (basic) व प्रयुक्त (applied) विज्ञानाच्या क्षेत्रांतील वैज्ञानिकांचें सतत सहकार्य घडवून आणणें इष्ट आहे.

### वैज्ञानिक संशोधनपद्धतींचें सार

अद्ययावत् विज्ञानविभागांचा इतिहास अवलोकन केल्यास असें दिसून येईल कीं, त्यांची उत्पत्ति प्रथमतः अकल्पित रीतीनें सुरू झाली आहे. ह्या अकल्पित अनुभवावस्थे–(Empirical stage)च्या नंतरची पायरी म्हणजे योजनाबद्ध अवस्था (Planned stage) होय. हीच वैज्ञानिक संशोधनाची सुरुवात होय. ह्या वैज्ञानिक संशोधनपद्धतींचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे : (१) गोळा केलेल्या सामग्री (Data) ची छाननी व मांडणी (२) प्रायोगिक किंवा अवलोकनात्मक पद्धतीनें त्या सामग्रीचें संशोधन व पडताळा (validation) (३) प्रायोगिक किंवा अवलोकित आविष्कारांच्या घटकांमधील परस्परसंबंधांचे-कार्यकारणभाव किंवा इतर-(Relationship–causal or associational) यांचें संशोधन (४) निर्णय (conclusion) (५) निर्णय प्रत्यक्ष परिस्थितीशीं सुसंवादी आहे कीं नाहीं हें पाहणें (६) उपयोगांत आणलेल्या 'संज्ञां' च्या मर्यादेचें व संशोधनाच्या क्षेत्रमर्यादेचें स्पष्टीकरण (Limitation of Symbols employed and statement of the frames of reference) इत्यादि. अशा प्रकारच्या क्लिष्ट मार्गानीं सिद्ध झालेले निर्णयच विज्ञानांत योजिले जातात. अशा प्रकारच्या संशोधनाभावीं कित्येक उथळ, साहसी फोल विधानें आपल्याकडील अध्ययनांत व लौकिक वाङ्मयांत कशीं बोकाळतात ह्याचें प्रत्यंतर पदोपदीं दिसून येतें.

### विज्ञान व वैज्ञानिक पद्धति यांचा अभ्यास

विद्यमान परिस्थितींत मनोविज्ञानाच्या विशिष्ट ज्ञानक्षेत्रांतहि आपलें कर्तव्य स्पष्ट आहे व त्याची रूपरेषा लेखकाच्या मतें खालीलप्रमाणें देतां येईल :

(१) मानसिक व्यापारांचें अध्ययन, अध्यापन व त्याचा इतर व्यावहारिक अगर वाङ्मयीन उपयोग–हीं वैज्ञानिक पद्धतीनेंच झालीं पाहिजेत. (२) त्याकरितां एक केंद्रीय मनोविज्ञानसंस्थेची स्थापना करणें इष्ट आहे. (३) हल्लीं मानसशास्त्र हें तत्त्वज्ञानाचें उपांग म्हणून शिकविलें जातें. ही प्रथा अनिष्ट आहे. ती आपल्या विश्वविद्यालयांनीं सोडून दिली पाहिजे. (४) ह्या जागीं जीवविज्ञानावर आधारलेल्या मनोविज्ञानाचें अध्ययन-अध्यापन सुरू करणें इष्ट आहे. (५) वैज्ञानिक पद्धती-(scientific methodology) चा सविस्तर अभ्यास करण्याचा उपक्रम आपल्याकडील विश्वविद्यालयांना अजूनहि पटलेला दिसत नाहीं. ह्याच्या अभावीं "विज्ञान" ह्या नांवाखालीं प्रसिद्ध केलेलें हरतऱ्हेचें लिखाण जनतेची दिशाभूल करण्यास कारणीभूत होतें.

आपल्याकडे शास्त्रीय अगर वैज्ञानिक विश्वविद्यालयीन पदवीधर विपुल असूनहि शास्त्रीय अगर वैज्ञानिक उच्च दर्जाची वाङ्मयनिर्मिति अत्यंत दुर्मिळ आहे. पुष्कळशा विज्ञानविषयक पदवीधरांचा शाळा, कॉलेजें व विश्वविद्यालयें यांमधून शिक्षक या नात्यानें प्रत्यहीं आधुनिक इंग्रजी अगर अन्य भाषेंतील समृद्ध अभिजात अशा शास्त्रीय अगर वैज्ञानिक वाङ्मयाशीं संबंध येत असूनहि, त्यांच्या हातून आपल्या भाषेंत अशा प्रकारची वाङ्मय-निर्मिति कां होऊं नये याचें सखेदाश्चर्य वाटतें. ही खेदजनक परिस्थिति नष्ट करावयाची असेल तर "वैज्ञानिक" वाङ्मयाची निर्मिति करणें हें आपल्या विश्वविद्यालयाचें आद्यकर्तव्य आहे ह्याची जाणीव झाली पाहिजे. ह्या दृष्टीनें कै. श्री. व्यं. केतकर यांनीं संपादिलेल्या "महाराष्ट्रीय ज्ञानकोश"चें आधुनिक रीतीनें संस्करण करून त्याचें विश्वविद्यालयातर्फे प्रसिद्धीकरण झालें पाहिजे. मराठी भाषेंत वैज्ञानिक परिभाषा रूढ करण्यास वैज्ञानिक विषयावरील संशोधन मराठीमध्यें प्रसिद्ध करण्याची विश्वविद्यालयानें सक्ती केली पाहिजे. प्रत्येक विज्ञानविभागांतील अधिकारी लेखन त्या त्या क्षेत्रांतून "उपजावें" लागतें. परिभाषा ही टांकसाळी नाण्याप्रमाणें निर्माण होऊं शकत नाहीं, ह्याची जाणीव अजून आपल्याकडे झालेली दिसून येत नाहीं.

या दिशयाला चालना देण्यास एक "वैज्ञानिक संघ" तयार करून त्याचेमार्फत अधिकृत व वैज्ञानिक पद्धतीनें तयार झालेलें वाङ्मय प्रसिद्ध केलें पाहिजे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

श्री. श्रीपाद जोशी

# उर्दूचें भवितव्य

## पाकिस्तानी रेडिओवरील हिन्दीप्रचुर भावगीतें

बहुसंख्य हौशी लोकांप्रमाणें मलाहि फावल्या वेळीं रेडिओ लावून बसण्याचा नाद आहे. अर्थात् माझा स्वतःचा रेडिओ नसल्यामुळें माझ्या या नादाला वेडाचें स्वरूप प्राप्त झालेलें नाहीं. आणि कदाचित् म्हणूनच रेडिओंतील माझा रस कमी झालेला नाहीं. हिंदुस्थानच्या फाळणीपूर्वीं मला दिल्लीकेंद्र विशेष आवडत असे; परंतु फाळणीनंतर मात्र दिल्लीअितकेंच लाहोर केंद्रहि मला आवडूं लागलें. आणि विशेषतः दिल्लीच्या अखिल भारतीय नभोवाणी-केंद्रांत काम करणाऱ्या कांहीं मित्रांकडून जेव्हां अशी माहिती समजली कीं फाळणीनंतर बहुतेक सर्व अव्वल दर्जाचे गाणारे आणि गाणारणी पाकिस्तानांत निघून गेल्या आहेत आणि हिंदुस्थानांत फक्त वादनकलानिपुणच राहिले आहेत, तेव्हां लाहोर, कराची, पेशावर नि ढाका या केंद्रांवरूनहि कार्यक्रम अैकून पाहण्याची अिच्छा अुत्पन्न झाली आणि लाहोर केंद्रावरून होणाऱ्या गाण्याच्या कार्यक्रमांनीं मनाला पुष्कळच संतोष दिला हें मान्य करणें भाग आहे.

अेक दिवस असाच लाहोर केंद्रलावून बसलों असतां मलिका पुखराजाचा भरदार आवाज कानीं आला. ती अल्ताफ कवीचें भावगीत गात होती.

परदेसी क्यों देस को भूले ?
किस डाकिनने रोका तुमको ?
घर आनेसे रोका तुमको ?
किसकी सुन्दरतापर भूले ?
कौन हो जो अल्ताफ पिया बिन
अुस भोले भाले रसिया बिन
होठोंको होठोंसे छू ले ?

अशीच अेकदां मुनव्वर सुलताना हें भावगीत गात होती :

माली रे परदेस न जा !
जो तुमने सींचीं फुलवारी
हरी भरी और प्यारी प्यारी
जिसकी कलीकलीसे तुमने
अपना खून बहाया !

त्याच प्रमाणें अेकदां कराची-केंद्रावरून सुलताना बेगम 'अेहसान' कवीचें हें भावगीत आपल्या पहाडी आवाजांत म्हणत होती :

दुनियाका मन रैनका सपना
मोहनगरमें चैनका सपना
रूप अनूप है नैनका सपना
किसकी हार और किसकी जीत
झूठे जग की झूठी प्रीत !

अशा प्रकारचीं भावगीतें जेव्हां जेव्हां मी पाकिस्तानी नभोवाणीकेंद्रांवरून अैकतों तेव्हां माझ्या मनांत अेक विचार हटकून येअून जातो. या गाणाऱ्या व्यक्ती मुनव्वर सुलताना, मलिका पुखराज, नसीम अख्तर, सुलताना बेगम, झीनत बेगम, शहनाज बेगम, अख्त मजीद, नजीर हुसैन, बहार बेगम या नसून, अीरा निगम, गायकी सरकार, कुसुम वर्मा, सुजाता चक्रवर्ती, संतोष अन्नरोध, विजयकुमार, पुठपा माथुर, विद्यानाथ सेठ यांच्यापैकीं कोणी तरी गात आहे असें सांगितल्यास तें केंद्र पाकिस्तानी आहे असें कोणी छातीठोकपणें सांगूं शकेल काय ? म्हणजे असें कीं या भावगीतांची भाषा अितकी हिन्दीप्रचुर असते कीं तीं हिन्दीचींच भावगीतें आहेत असें कोणीहि म्हणेल. ती अुर्दू लिपींत लिहिलीं जातात आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मुस्लिम गायक व गायिका पाकिस्तानी नभोवाणी-वरून तीं गातात म्हणूनच त्यांना अुर्दू म्हणावयाचें हा अेक विचार आला.

## झाड पाकिस्तानांत, मुळें भारतांत

याच्या पाठोपाठ दुसरा अेक विचार मनांत येतो. देशाची फाळणी झाल्यानंतर पाकिस्तानमध्यें यापुढें असली भाषा लिहिली वा बोलली जाण्याची शक्यता कितपत आहे ?

आणि हाच विचार बराच वेळ घोळत राहतो. कारण आज पाकिस्तानमध्यें जितका प्रदेश आहे त्यांत अुर्दू ही प्रादेशिक भाषा असलेला थोडाहि भाग नाहीं. किंवा हीच गोष्ट या शब्दांत मांडतां येअील कीं आज पाकिस्तानची राज्यभाषा व राष्ट्र-भाषा जरी अुर्दू ठरविण्यांत आली असली तरी अुर्दू ही मातृभाषा असलेले लोक मात्र पाकिस्तानांत नाहींत. ( अर्थात् हिंदुस्थानांतून पाकिस्तानांत नुक-तेच निघून गेलेले भारतीय मुसलमान वगळावयाचे). आज पाकिस्तानांत अुर्दू ही कुणाचीच मातृभाषा अथवा प्रांतभाषा नाहीं. कुणाची मातृभाषा सिन्धी आहे तर कुणाची पंजाबी, कुणाची बलुची आहे तर कुणाची पश्तो, आणि सर्वांत मोठ्या जनसंख्येची मातृभाषा तर बंगाली आहे. आणि त्यांच्यापैकीं प्रत्येक जनसमुदायाला आपापल्या मातृभाषेचा अत्यंत अभिमान आहे. अशा स्थितींत अुर्दूचें भवितव्य काय, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे.

अुर्दू कवितेचा जन्म जरी बहामनी साम्राज्यांत दक्षिणेकडे झाला असला तरी अेकूण अुर्दू भाषा आणि साहित्य यांची जन्मभूमि पश्चिम संयुक्त प्रांत आणि दिल्लीच्या आसपासचा प्रदेश ही होय. हैद्रा-बाद हें जरी अुर्दूचें अेक प्रभावी केंद्र असलें तरी त्या केंद्राचें सामर्थ्य हें कृत्रिम होतें. जोंपर्यंत निजा-मशाही राजवट अस्तित्वांत होती अथवा राहील तोंपर्यंतच हैद्राबादचें अुर्दू-केंद्र हें प्रभावी व वैभव-शाली राहाणार. अेकदां जनतेच्या हातीं सत्ता आली कीं–( आणि तो काळ कांहीं फार लांब नाहीं )– प्रांतभाषा म्हणून तेलुगु, मराठी व कानडी आणि राज्यभाषा म्हणून हिन्दी यांचें महत्त्व आपोआप प्रस्थापित होणार आणि अुर्दू होती कीं नव्हती अशी स्थिति अुत्पन्न होणार. ही स्थिति दिल्ली व लखनौ या दोन मुख्य अुर्दू केंद्रांची नव्हती. त्यांना प्रारंभीं बादशाह आणि नबाब यांच्यामुळें महत्त्व आलें हें खरें असलें तरी मोगल साम्राज्याचा अस्त झाल्या-नंतर जनतेनें व विद्वानांनींच या केंद्रांचें महत्त्व टिकविलें व वाढविलें. आणि यामुळेंच दिल्ली व लखनअू यांच्या आसमंतांतील प्रदेश ही अुर्दूची मातृभूमि समजली जाअूं लागली.

देशाच्या फाळणीनंतर मोठी चमत्कारिक स्थिति निर्माण झाली. पाकिस्ताननें अुर्दूचें झाड आपल्या प्रदेशांत नेअून लावलें खरें; परंतु त्याचीं मुळें येथेंच राहिलीं. आणि भारतीय जनतेनें हिन्दीला–नागरी लिपींत लिहिलेल्या हिन्दीलाच–राज्यभाषेचा मान देऊन अुर्दूचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा, किंवा दडपून टाकण्याचा चंग बांधला. घटना परिषदेनें राज्यभाषाविषयक आपल्या ठरावाच्या सातव्या परिशिष्टांत अुर्दूला स्थान दिलेलें आहे खरें; परंतु तें संस्कृतप्रमाणें नुसतें परिशिष्टांतच राहाणार आहे. कारण अितर बारा भाषांचे भाषावार प्रांत होअूं शकतात–आणि ते होणार यांत शंका नाहीं–परंतु संस्कृत व अुर्दू या दोन भाषांचे मात्र प्रांत बनूं शकत नाहींत. कांहीं लोकांच्या समाधासांनाठींच या दोन भाषांना परिशिष्टांत स्थान दिलें गेलें असावें; कारण अुर्दू ही कोणत्याहि अेका मोठ्या सलग भूप्रदेशाची भाषा नाहीं आणि संस्कृत ही फक्त पुस्तकांतीलच भाषा अुरली आहे.

## प्रमुख उर्दूलेखक भारतांतच

अुर्दूच्या भवितव्याला मारक अशी आणखी अेक गोष्ट आहे ती म्हणजे अुर्दू ही कांहीं फक्त मुसलमानांची भाषा नाहीं. आपल्यापैकीं अजूनहि पुष्कळ जण याच भ्रमांत आहेत कीं अुर्दू ही मुसल-मानांची भाषा आहे. आणि म्हणून त्यांचा मुस्लिम-द्वेष अुर्दूलाहि झोडपूं पाहतो. परंतु त्यांना माहीत नाहीं कीं अुर्दू लेखकांमध्यें मुसलमानांच्यापेक्षां जास्त जरी नसले तरी निदान बरोबरीनें हिन्दु लेखक आहेत. किंबहुना कथा-कादंबरी आणि नाटक हा ललित साहित्याचा भाग बहुसंख्य हिन्दु लेखकांनींच व्यापलेला आहे. जुन्या काळचे मुन्शी दयानारायण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

निगम, मुन्शी नवलकिशोर, दयाशंकर कौल 'नसीम, मुन्शी निहालचंद, पंडित बिशन नारायण दर, श्री. मदारीलाल, पंडित मनोहरलाल झुत्शी, पंडित मुकुंद-राम, प्रोफेसर रामचंद्र, लाला श्रीराम देहलवी, लल्लूलालजी, पंडित रतननाथ दर 'सरशार', शिवव्रतलाल बर्मन, सदल मिश्र, वेणीनारायण 'जहाँ', सितारे हिन्द, मुन्शी हरसुखराय वगैरे साहित्यिक वगळले तरी आधुनिक काळांतील आधुनिक राष्ट्रीय कवितेचे जनक पंडित ब्रजनारायण चकबस्त, गोरखप्रसाद 'अिबरत', अल्लामा पंडित ब्रजमोहन दत्तात्रय कैफी, डॉक्टर लक्ष्मीदत्त वगैरे प्रसिद्ध कवि व लेखक, अुर्दू कादंबरीचे जनक मुन्शी धनपतराय प्रेमचंद, त्यांचाच लौकिक पुढें चालविणारे पंडित सुदर्शन आणि आजच्या अुर्दू कथासाहित्याचे मुकुटमणी श्रीकृष्णचंद, '...और अिन्सान मर गया' ही अप्रतिम कादंबरी लिहिणारे श्री. रामानंद सागर, हिन्दी साहित्यांत अुर्दूपेक्षांहि जास्त नांव कमावणारे श्री. अुपेंद्रनाथ अश्क, कृष्णकुमार, आधुनिक कवींमध्यें मानाचें स्थान असलेले श्री. रघुपतिसहाय 'फिराक', कृष्णचंद्रांचे लहान बंधु श्री. महेन्द्रनाथ, श्री. राजेंद्रसिंग बेदी, श्री. 'देवेंद्र सत्यार्थी, बलवन्त सिंह, जगन्नाथ आझाद, ग्यानचंद्र, प्रेमनाथ परदेसी, प्रकाश पंडित, बिशन नारायण हामी बरेलवी, डॉक्टर ताराचंद, कन्हैयालाल कपूर, श्री. कुलभूषण, श्री. कर्तारसिंह दुग्गल, श्री. श्रीकृष्णदास, श्री. मुल्कराज आनंद, श्री. संतसिंह सेखों, श्री. कृष्ण-प्रसाद कौल, श्री. रणवीरसिंह 'वीर' वगैरे अनेक साहित्यिक मुसलमानेतरच होते व आहेत. यामुळे देशाच्या फाळणीबरोबरच जणूं अुर्दू लेखकांचीहि फाळणी झाली! या मुसलमानेतर लेखकांपैकीं बहुतेकांना त्यांच्या अिच्छेविरुद्ध पश्चिम पंजाब सोडून भारतांत यावें लागलें आहे. परंतु त्याचबरोबर आघाडीवरील मुस्लिम लेखक मात्र भारत सोडून पाकिस्तानांत गेले नाहींत. आजच्या कवींतील सर्व-श्रेष्ठ समजले जाणारे जोश मलीहाबादी, हसरत मोहानी, अकबराबादी, सागर निजामी, साहिर लुधियानवी, कैफी आजिमी, निय़ाज हैदर, अली सरदार जाफरी, जिगर मुरादाबादी, मिजाज, मजरूह, अिज़्हार मलीहाबादी, जमीला खातून तसनीम, बाकर रझवी, अहमद मुस्तबा 'वामिक' जौनपूरी, कथालेखकांपैकीं अख्तर हुसैन रायपूरी, ख्वाजा अहमद अब्बास, अख्तर अन्सारी, कदूस सहबाई, रशीद अख्तर नद्वी, माहिर अुलकादरी, शकीला अख्तर, अस्मत चुगताअी, सालिहा आबिद हुसैन, अस्करी, रअीस अहमद जाफरी, कैस रामपूरी, गंभीर लेखकांपैकीं डॉक्टर आबिद हुसेन, प्रोफेसर मुजीब, रशीद अहमद सिद्दीकी, अेहतिशाम, अिबादत बरेलवी, मौलाना अबुल कलाम आजाद, काजी मुहम्मद अब्दुलगफ्फार, डॉक्टर सैयद अैजाज हुसैन, सैयद शमशाद अहमद वगैरे बहुतेक सर्व प्रमुख अुर्दू लेखक भारतांतच आहेत. आणि भारतांत तर अुर्दूला कोणी विचारीत नाहींशी स्थिति निर्माण होअूं पाहात आहे.

### भौतिकापेक्षां सांस्कृतिक हानि अधिक

एका सुप्रसिद्ध अुर्दू लेखकांशीं बोलतांना ते म्हणाले: "पाकिस्तान निर्माण झाल्याबरोबर दिल्लींतील मुसलमानांनीं आपापल्या मुलांबाळांना हिन्दी शिकवायला सुरवात केली. आतां आमचीं पुस्तकें कोण वाचणार, देवाला ठाऊक! सबंध पंजाबांत माझीं अुर्दू पाठ्यपुस्तकें चालूं होतीं. आतां तेथील सरकारच्या नव्या हुकमामुळें मला तीं सगळीं हिन्दी भाषेंत नि नागरी लिपींत प्रसिद्ध करावीं लागलीं आहेत." हे लेखक दुसरे तिसरे कोणी नसून पंडित सुदर्शनच होत, ही गोष्ट चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आली असेलच.

पाकिस्तान निर्माण झाल्यानंतर दिल्लीच्या 'तेज' या अुर्दू पत्राच्या दिवाळी अंकांत 'पाकिस्तानके कयामसे अुर्दू अदबका सत्यानास' (पाकिस्तानच्या प्रस्थापनेमुळें अुर्दू साहित्याचा सर्वनाश) या शीर्षकाखालीं श्री. ख्वाजा अहमद अब्बास यांनीं एक लेख लिहिला होता. त्यांत ते म्हणतात:

"आजकल हिन्दुस्तानके उत्तर पच्छिमी अिलाकेमें जो खानाजंगी (गृहयुद्ध, यादवी) हो रही है अुसके बदतरीन हताहतोंमें (भयंकर नुकसानीमध्यें) अुर्दू अदब (साहित्य) है" आणि याचें प्रत्यक्ष कारण म्हणून ते सांगतात: "लाहोर आणि दिल्ली यां ठिकाणीं असलेल्या अुर्दू प्रकाशनाच्या सर्व व्यवस्था



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नष्टभ्रष्ट होऊन गेल्या आहेत. प्रकाशकांचीं सुमारें दहालाख रुपये किंमतीचीं पुस्तकें, अत्यंत मौल्यवान् अशीं ग्रंथालयें व जुनीं हस्तलिखितें, साहित्यिक पत्रिका आणि मासिकें यांचे संग्रह जळून गेले. आग लावणाऱ्यांनीं अगदींच अंदाधुंदी व बेनडोकपणा केला. दिल्लीच्या जामियामिल्लिया अिस्लामिया या ( राष्ट्रीय मुसलमानांच्या ) विद्यापीठाचें ' मकतबा जामिया ' हें पुस्तक-भांडार जाळून टाकण्यांत आलें. या पुस्तकभांडारानें महात्मा गांधी व जवाहरलाल नेहरू यांच्या ग्रंथांचे अुर्दू अनुवाद प्रकाशित केले होते. त्याचप्रमाणें लाहोरची ' मकतबाअे अुर्दू ' ही प्रकाशन-संस्था व तिचा ग्रंथसंग्रह हीं जाळून टाकण्यांत आलीं. या संस्थेतर्फे कृष्णचंद्र, राजेंद्रसिंह बेदी, अस्मत चुगताअी यांसारख्या पुरोगामी ( हिन्दु, मुस्लिम व शीख ) लेखकांचीं पुस्तकें प्रकाशित होत असत. तेथील सर्व पुस्तकें जळून गेलींच, पण शिवाय छापखान्यांत ज्यांची छपाअी चालू होती अथवा होणार होती अशीं पुष्कळशीं मौल्यवान् हस्तलिखितेंहि आगीच्या भक्ष्यस्थानीं पडलीं. ''

अर्थात् हें जें भौतिक नुकसान झालें तें सांस्कृतिक नुकसानाच्या मानानें कांहींच नव्हे. पुस्तकें आज जळालीं तरी अुद्यां पुन्हां तीं छापतां येतील. परंतु ' फाळणीमुळें हिंदुस्थानचें भौगोलिक, राजकीय व आर्थिक अैक्य नष्ट झालें आणि त्याबरोबरच हिन्दुस्थानच्या सांस्कृतिक अैक्याच्या पुष्कळशा स्मृतीहि नाहींशा झाल्या. यांपैकीं सर्वांत टळक स्मृति म्हणजे अुर्दू साहित्य व अुर्दू भाषा ही होती. '

पाकिस्तानांत कुणाचीच मातृभाषा अुर्दू नसल्यामुळें तेथें अुर्दू ही राज्यभाषा असली तरी तिचा प्रचार सार्वत्रिक होणें कठिण आहे. आणि लाहोर व त्याच्या आसपासचीं थोडीं मोठीं शहरें वगळल्यास अुर्दूला सर्वसामान्य व्यवहारांत कुठेंच स्थळ मिळणें शक्य नाहीं. शिवाय पंजाबी लोकांच्या सार्वत्रिक आक्रमणामुळें आणि प्रभुत्वामुळें त्रस्त व नाराज झालेले सिंधी, पठाण, बलुची व बंगाली सहजासहजीं अुर्दूचा स्वीकार करतील अशी शक्यता नाहीं. अर्थात् मुसलमानांतील ज्या धर्मवेडाच्या जोरावर पाकिस्तानची निर्मिति करण्यांत आली त्याच धर्मवेडाला आवाहन देऊन सबंध पाकिस्तानची भाषाच अुर्दू बनविण्याचा प्रयत्न होणारच नाहीं असें हमखासपणें सांगतां येणार नाहीं. आपल्या भारतांतहि सबंध देशामध्यें हिन्दी ही अेकच भाषा प्रचलित व्हावी असें म्हणणारे व त्याप्रमाणें प्रचार करणारे लोकहि कांहीं थोडे नाहींत ! परंतु सध्यां तरी ती गोष्ट शक्य कोटींतील वाटत नाहीं.

## निःपक्ष विचार आज शक्य नाहीं

आतां प्रश्न असा अुभा राहतो कीं पाकिस्तानांत अुर्दूचें भवितव्य अंधकारमय असलें तरी अुर्दूची मातृभूमि असलेल्या भारतांत तिचें भविष्य अुज्ज्वल कां असूं नये ? वस्तुतः तशीच स्थिति असावयास हवी होती. परंतु बहुसंख्य मुसलमानांनीं अुर्दू ही जातीय भाषा आहे असें मानून तिला वाजवीपेक्षां मोठें स्थान—राष्ट्रभाषेचें स्थान—मिळवून देण्याची आकांक्षा बाळगली. त्यांच्या या आकांक्षेंत सर तेजबहादुर सप्रू, डॉक्टर ताराचंद, पंडित सुंदरलाल, पंडित ब्रजमोहन दत्तात्रेय कैफी वगैरे कांहीं विद्वान् हिंदूहि सहभागी होते हें खरें. परंतु त्यामुळें अुर्दूवर मुसलमानांनीं फासलेला जातीयतेचा भडक रंग कांहीं कमी भडक होत नाहीं. परंतु मुसलमानांनीं अुर्दूला राष्ट्रभाषेचें पद मिळवून देण्याची खटपट केली हा त्यांचा खरा अपराध नसून त्यांनीं हरप्रयत्नानें हिंदीला दाबून टाकण्याची—नेस्तनाबूद करण्याची—हांव बाळगली हा त्यांचा भयंकर अपराध होय. याचा अेकच पुरावा म्हणून असें सांगतां येअील कीं जें रेडिओखातें बुखारी वगैरे अुर्दूप्रेमी मुसलमानांच्या हातीं होतें त्यांत त्यांनीं मुसलमानांची व अुर्दूविषयीं पक्षपात बाळगणाऱ्या हिंदूंची भरमसाट भरती करून हिंदीची पद्धतशीर गळचेपी चालविली होती. यामुळें मुसलमानांप्रमाणेंच अुर्दूविरुद्धहि हिंदूंचीं—विशेषतः अुत्तर भारतांतील शिक्षित हिंदूंचीं—मनें बिथरून गेलीं. आणि जोंपर्यंत मुसलमानासंबंधीं हिंदूंचीं मनें साफ होणार नाहींत तोंपर्यंत अुर्दूविषयींचे त्यांचे कलुषित ग्रहहि दूर होणार नाहींत. पाकिस्तानच्या धोरणामुळें भारतांतील हिंदूंचीं मनें अधिकाधिक बिथरत आहेत. यामुळें अुर्दूच्या बाबतींत लोक निःपक्षपणें विचार करूं लागतील अशी सध्यां तरी शक्यता नाहीं.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# उर्दूचें भवितव्य

## अुर्दूनें नागरी लिपि स्वीकारावी

जामिया मिल्लियाचे विद्वान् प्राध्यापक डॉक्टर आबिद हुसैन यांना या बाबतींत विचारलें असतां ते म्हणाले : " आज हिंदीचें जें स्वरूप आहे त्यांत जर लोकमतानुवर्ती बदल घडून आला नाहीं तर आम जनता अुर्दूकडे वळेल. आणि मग अुर्दूचें भवितव्य खूपच अुज्ज्वल होईल. मात्र त्यासाठीं अुर्दूला आपल्या लिपीचा त्याग करून नागरी लिपि स्वीकारावी लागेल. "

आणि माझ्या मतें या प्रश्नाचें खरें अुत्तर हेंच आहे. आज हिन्दी ही राज्यभाषा झालेली असली तरी ती अद्यापि राष्ट्रभाषा झालेली नाहीं. त्यासाठीं तिला सबंध राष्ट्राकडून मान्यता मिळावयास हवी. ही मान्यता नुसत्या विधिमंडळांत मिळून भागणार नाहीं, ती जनतेच्या जीवनांत दिसून आली पाहिजे. आणि त्यासाठीं हिन्दीनें जरा नम्र होअून आपल्या भाषाभगिनींना त्यांचें योग्य तें स्थान मिळवून देण्यास साहाय्य केलें पाहिजे. परंतु आज हिन्दीची मान फारच वर झाली आहे. सर्व भारतीय भाषांची आपण राणीच आहोंत असा अहंकार तिच्या ठिकाणीं अुत्पन्न झाला आहे. यामुळें ती राज्यभाषा होण्यापूर्वीं तिच्या अितर भाषाभगिनींच्या मनांत तिच्याविषयीं जो आदर व आपलेपणा होता त्यालाहि आतां ओहोटी लागूं लागली आहे. अशीच परिस्थिति अधिक काळ चालूं राहिल्यास हिन्दीविरुद्ध फार जोरदार वातावरण तयार होअील आणि तिला सिंहासनावरून खालीं खेंचून तिच्या जागीं गांधीजींनीं सांगितलेल्या हिन्दी-अुर्दूमिश्रित हिन्दुस्थानीची स्थापना करण्यांत येअील हें सांगण्यास फार मोठ्या ज्योतिष्याची जरूर नाहीं.

शिवाय हिन्दी ही दिवसेंदिवस अितकी क्लिष्ट व बोजड होत चालली आहे—राज्ञीपदावर आल्यामुळें तिचें शरीर असें कांहीं स्थूल होअूं लागलें आहे—कीं ती आम जनतेपासून फारच दूर चालली आहे. आजचीं हिन्दी वृत्तपत्रें, मासिकें व पुस्तकें अितकी भयंकर संस्कृतप्रचुर भाषा वापरीत आहेत कीं अन्यभाषीय बाजूलाच राहोत, प्रत्यक्ष हिन्दीभाषीयांपैकीं देखील किती लोकांना ती कळत असेल याची शंकाच आहे. ही परिस्थिति फार काळ टिकून राहणें शक्य नाहीं. थोड्याच अवधींत—खरेंखुरें जनताराज्य स्थापन झाल्यानंतर—जनतेची भाषा आजच्या हिन्दीची जागा घेअील. आणि आजची हिन्दी ही प्रान्तीय हिन्दी म्हणून राहील व राष्ट्रभाषा हिन्दी नव्या स्वरूपांत अवतीर्ण होअील. ही नवी हिन्दी अुर्दूला जवळची असेल. (हिलाच गांधीजी हिन्दुस्तानी म्हणत असत.)

मात्र त्यासाठीं आजपासूनच अुर्दूनें आपली लिपि सोडून नागरी लिपीचा स्वीकार केला पाहिजे. अुर्दूला या गोष्टीची जाणीव झाली आहे असें दिसतें. डॉक्टर आबिद हुसेन यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या ' नअी रोशनी ' या साप्ताहिकावर आतां नागरी अक्षरें झळकूं लागलीं आहेत. ' सरगम ' हें श्री. ख्वाजा अहमद अब्बास यांचें मासिक नागरी लिपींतच प्रकाशित होत असतें; या मासिकाचे संपादक व लेखक वगैरे बहुतेक प्रसिद्ध अुर्दू लेखक असून ते आतां नागरी लिपींत प्रसिद्धीस येअूं लागले आहेत. या मासिकानें थोड्याच अवधींत जी अफाट लोकप्रियता मिळविली आहे त्यावरूनहि हेंच सिद्ध होतें कीं यापुढें अुर्दूनें आपली अशास्त्रीय व क्लिष्ट लिपि सोडून नागरीचा अवलंब केल्यास ती जनतेंत अधिकाधिक लोकप्रिय होअूं लागेल आणि वेळ आल्यास हिन्दीचेंहि स्थान घेअूं शकेल.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रा. नी. वि. सोवनी

# आग्नेय आशिया : आर्थिक पारतंत्र्यांतून स्वातंत्र्याकडे

आग्नेय आशियामधील देशांत पाश्चिमात्य देशांचें साम्राज्य स्थापन झाल्यानंतर जीं सामाजिक व आर्थिक स्थित्यंतरें झालीं त्यांचें पूर्वींच्या दोन लेखांतून[1] वर्णन केलें. सार्वभौम राष्ट्रांचें या मांडलिक राष्ट्रासंबंधीं कोणतें धोरण होतें यांचेंहि थोडेसें दिग्दर्शन त्याच लेखांतून केलें आहे. हें धोरण कालौघाबरोबर हळूंहळूं बदललें. तें कां व कसें बदललें याकडे आतां वळलें पाहिजे. त्याप्रमाणेंच सर्वच सार्वभौम राष्ट्रांची मांडलिकांसंबंधींची धोरणें एकसारखीं नव्हतीं. देशकालपरिस्थितीप्रमाणें तींहि निरनिराळीं व आपापल्यापरीं वैशिष्ट्यपूर्ण होतीं. त्यासंबंधींहि चर्चा करणें आवश्यक आहे.

## औद्योगिक क्रांतीपूर्वी व नंतर

इंग्लंडच्या ( वसाहत ) मांडलिकविषयक धोरणांतील विकासक्रमापासून सुरुवात करणें सोईचें होईल. इंग्लंड व युरोपियन राष्ट्रांपैकीं पोर्तुगाल व स्पेन यांनीं १५ व्या शतकापासूनच जगांतील निरनिराळ्या भागांत वसाहती निर्माण करण्यास सुरुवात केली होती. औद्योगिक क्रांतीपूर्वींहि इंग्लंडचें साम्राज्य बऱ्याच भूभागावर विस्तारलेलें होतें. इंग्लंडच्या इतिहासकारांनीं या साम्राज्यास ' पहिलें इंग्रजी साम्राज्य ' असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. या काळांत सर्वच साम्राज्यशाही राष्ट्रांचें मांडलिकविषयक धोरण त्यावेळीं अर्थशास्त्रांत प्रचलित असलेल्या ' व्यापारी ' तत्त्वज्ञानावर आधारलेलें असे. या तत्त्वज्ञानाप्रमाणें मांडलिक देश अगर वसाहती यांनीं सार्वभौम राष्ट्रास लागेल तो कच्चा माल पैदा करावा, तो सार्वभौम राष्ट्रांच्या जहाजांतूनच त्यास पोंचवावा व तेथें तयार झालेला पक्का माल विकत घ्यावा. त्यांनीं फक्त सार्वभौम राष्ट्राशींच व्यापार करावा. कोणत्याहि प्रकारच्या उद्योगधंद्यांची वाढ मांडलिक देशांत होतां कामा नये.

आग्नेय आशियांतील इंग्लंडच्या साम्राज्याखालीं आलेले देश इंग्रजी अंमलाखालीं आणण्याचें मुख्य काम ईस्ट इंडिया कंपनीसारख्या व्यापारी मंडळ्यांनीं केलें होतें व या देशांचें आर्थिक शोषण करून कमींत कमी वेळांत जास्तींत जास्त नफा कसा काढतां येईल याकडेच त्यांचें मुख्यतः लक्ष होतें. इंग्लंडच्या सरकारनें जेव्हां या व्यापारी मंडळ्यांकडून काढून हे प्रदेश आपल्या हातीं घेतले तेव्हां त्यास या प्रदेशांसंबंधीं थोडें निराळें धोरण आंखावें लागलें. ॲडम स्मिथनें हा फरक आपल्या ' राष्ट्रांची संपत्ति ' या सुप्रसिद्ध ग्रंथांत विस्तारपूर्वक चर्चिला आहे. व्यापारी मंडळ्यांप्रमाणें घातुक परिणामांकडे अजिबात लक्ष न देतां फक्त जास्तींत जास्त नफा मिळविण्यासाठीं या मांडलिक देशांचें आर्थिक शोषण करण्याचें धोरण इंग्लंडच्या राज्यकर्त्यांस स्वीकारणें शक्य नव्हतें. त्या देशांतील राज्ययंत्र चालविण्याच्या दृष्टीनें सापत्न मातेच्या दृष्टीनें का होईना पण तेथें थोडीफार आर्थिक सुस्थिति निर्माण करणें त्यांस आवश्यक होतें. याचा अर्थ या देशांचें आर्थिक शोषण थांबवावयाचें व पूर्वींचें व्यापारी मंडळ्यांचें

१. ' नवभारत ' जानेवारी १९४९ व मार्च १९४९ या दोन अंकांत हे दोन लेख आले आहेत.






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

धोरण आमूलाग्र बदलावयाचें असा नव्हता. तर फक्त फायदा मिळविण्यांत थोडी सबूरी करावयाची इतकाच होता. आर्थिक शोषण करावयाचें परंतु थोड्या दमानें. सोन्याचीं अंडीं घालणारी हंसी न मारतां दीर्घकालपर्यंत तिनें सोन्याचीं अंडीं घालावीं अशी काळजी घ्यावयाची असें त्याचें थोडक्यांत वर्णन करतां येईल.

औद्योगिक क्रांतीनंतरच्या इंग्लंडच्या साम्राज्यास 'दुसरें इंग्रजी साम्राज्य' असें इतिहासकारांनीं नांव दिलेलें आहे. या काळांत मांडलिक देशासंबंधींच्या पूर्वींच्या धोरणावर अर्थशास्त्रज्ञ व राजकीय पुढारी यांजकडून पुष्कळच गहजब करण्यांत आला. त्या वेळच्या इंग्लंडच्या परिस्थितीस अनुरूप अशीच ही विचारप्रणाली होती. औद्योगिक क्रांति इंग्लंड-मध्यें प्रथम झाली. त्यामुळें इंग्लंड जगांतील उद्योग-धंद्यांचें माहेरघर बनलें. १९ व्या शतकाच्या पहिल्या ७०–८० वर्षांत सर्व जगांतील औद्योगिक राष्ट्रांत इंग्लंड अग्रभागीं होतें. जगाच्या व्यापारी पेठेंत इंग्लंडचें अग्रेसरत्व अप्रतिहत होतें. त्यास म्हणण्या-सारखा प्रतिस्पर्धी कोणीच नव्हता. इंग्लंडच्या मालास सर्वत्र मागणी होती. त्यामुळें इंग्रजी अंमलाखालील प्रदेशांतच इंग्लंडची बाजारपेठ सामावलेली नव्हती. इंग्लंडच्या राजकीय सत्तेखालीं नसलेल्या प्रदेशां-मधील व्यापारीपेठांहि इंग्लंडच्या अबाधित वर्चस्वा-खालीं होत्या त्यामुळें मांडलिक अगर वसाहतींच्या प्रदेशावर राजकीय सत्ता असल्यासच तेथील व्यापार इंग्लंडच्या हातीं राहतो अशी परिस्थिति नव्हती. राजकीय वर्चस्व नाहींसें झालें तरी त्यामुळें इंग्लंडच्या आर्थिक वर्चस्वास बाध येण्याचा अगर त्याचा आर्थिक फायदा कमी होण्याचा संभव सुतराम् नव्हता. त्यामुळें इंग्लंडच्या वसाहती अगर मांडलिक देश यांच्या संरक्षणासाठीं अगर इतर बाबींवर खर्च करणें म्हणजे इंग्लंडच्या पैशाचा अपव्यय आहे असें १९ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास इंग्लंडमधील अनेक विचारवंतांस व राजकीय पुढाऱ्यांस वाटूं लागलें होतें. 'वसाहती म्हणजे इंग्लंडच्या गळ्यांतली धोंड आहे' असें त्या वेळीं म्हणण्याचा प्रघात पडला होता.

परंतु ही परिस्थिति लवकरच बदलली. साधारण-पणें १८७० पासून फ्रान्स, जर्मनी, अमेरिका व २० व्या शतकाच्या सुरवातीपासून जपान—हीं नवीं औद्योगिक राष्ट्रें इंग्लंडशीं चढाओढ करण्यास पुढें आलीं. व इंग्लंडला आपली पूर्वींची बाजारपेठ राखणें दिवसेंदिवस अवघड होऊं लागलें. गेल्या शतकाच्या शेवटच्या २०-२५ वर्षांत आर्थिक मंदीची लाट आली व ती दीर्घकाल टिकली. त्यामुळें या शतकांत तों पावेतों अप्रतिहत होत असलेल्या आर्थिक प्रगतीस खंड पडला. १८७० सालच्या फ्रान्स व जर्मनीच्या लढाईमुळें जागतिक शांततेचा भंग होऊन कोणत्याहि राष्ट्रास निव्वळ आर्थिक उन्नतीकडेच लक्ष न देतां स्वसंरक्षणासाठीं लष्करी सामर्थ्यहि वाढवणें व तें कायम ठेवणें आवश्यक आहे याची जाणीव निर्माण झाली. या बदललेल्या परि-स्थितींत मांडलिक देश ही गळ्यांतली धोंड नसून ते आपल्या काबूंत ठेवून त्यांपासून आर्थिक व लष्करिक बळाचा परिपोष करणें आवश्यक आहे अशी विचारप्रणाली इंग्लंडमध्यें उदय पावली. खुला व्यापार सोडून साम्राज्यान्तर्गत व्यापारावर सवलतीच्या जकाती बसवाव्या व तो व्यापार वाढवावा अशा प्रकारची योजना जोसेफ चेंबरलेन यानें देशापुढें मांडली. मांडलिक देशांसंबंधींचें औद्योगिक क्रांती-पूर्वींचें धोरण पुन्हां नवीन साधनांनीं व नवीन जोमानें आचरण्यांत येऊं लागलें. फ्रान्स, हॉलंड, बेल्जियम् वगैरे देशांची आर्थिक परिस्थिति या काळांत इंग्लंडप्रमाणें कधींच नसल्यामुळें त्यांच्या मांडलिकविषयक धोरणांत फारशी चलबिचल झालेली आढळत नाहीं. त्यांचें पूर्वींचेंच धोरण अविच्छिन्न चालूं होतें.

## मांडलिक देशांची असमतोल अर्थव्यवस्था

२० व्या शतकाच्या सुरवातीपासून सार्वभौम-राष्ट्रांच्या याहि धोरणांत थोडा थोडा फरक पडूं लागला. १९०५ सालीं जपाननें रशियाचा पराभव केला. एका पौर्वात्य राष्ट्रानें एका बलाढ्य पाश्चिमात्य राष्ट्राचा पराभव केल्यामुळें पौर्वात्य देशांतील पाश्चिमात्य राष्ट्रांच्या वर्चस्वामुळें निर्माण झालेला स्वतःबद्दलचा न्यूनगंड बराचसा कमी होऊन तेथील जनतेंत एकप्रकारच्या मानसिक व सामाजिक



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

पुनरुज्जीवनास सुरुवात झाली. राष्ट्रीयत्वाचे वारे सर्वत्र वाहूं लागले. राष्ट्रीय चळवळींना जोर चढला. चीनमधील जुनी बादशाही उलथून पडली. इंडोनेशिया, इंडोचीन, फिलिपाइन बेटें व हिंदुस्थान येथील जनतेस थोडेफार राजकीय हक्क सार्वभौम राष्ट्रांकडून देण्यांत आले.

१९१४ च्या पहिल्या महायुद्धाच्या काळांत व नंतर धोरणाचें सुकाणूं अधिकच फिरलें. युद्धकाळांत सार्वभौम राष्ट्रांचें व मांडलिक देशांचें दळणवळण जवळजवळ तुटल्यासारखेंच झालें. त्यामुळें तेथील सरकारांस थोड्या-फार प्रमाणावर स्वयंशासित होणें भाग पडलें. सार्वभौमांचें सर्वस्व युद्धकार्यांत पणास लागल्यामुळें त्यांस मांडलिक देशांकडून जास्तींत-जास्त मदत मिळण्याच्या दृष्टीनें तेथील जनतेस खूष करण्याचें धोरण स्वीकारावें लागलें. मांडलिक देशांतील उद्योगधंद्यांच्या वाढीस विरोध न करतां थोडाफार हातभार लावण्याचें धोरणहि त्यांस अंगीकारावें लागलें.

१९२९ च्या जागतिक मंदीनें मांडलिक देशांची आर्थिक स्थिति फारच खालावली. कच्च्या मालाच्या किंमती सर्व जगभर फार झपाट्यानें उतरल्या व औद्योगिक राष्ट्रांतील आर्थिक मंदीमुळें कच्च्या मालाची मागणीहि सर्वत्र कमी झाली. मांडलिक देशांचा कच्च्या मालाच्या निर्यातीवर अवलंबून असणारा आर्थिक डोलारा कोलमडून पडला. इंडोनेशियाहून निर्गत होणाऱ्या मालाची किंमत १९२९ ते १९३३ च्या दरम्यान ६७ टक्क्यांनीं उतरली व एकंदर निर्गत १७ टक्क्यांनीं कमी झाली. बाहेरून आयात होणाऱ्या तांदुळाच्या किंमती भरमसाटपणें उतरल्यामुळें तांदूळ पिकविणारा तद्देशीय शेतकरी साफ बुडण्याच्या पंथास लागला. इंडोचीनमधून होणारी तांदुळाची निर्गत १९२८ त १८ लक्ष टन होती ती १९३१ मध्यें ९½ लक्ष टनांइतकी उतरली व तांदुळाच्या किंमती याहीपेक्षां अधिक प्रमाणांत उतरल्या. याच काळांत सयाममधील तांदुळाची निर्गत ४० टक्क्यांनीं उतरली. मलायामध्यें जागतिक मंदीचे झालेले परिणाम खालील[२] आंकड्यांवरून स्पष्ट होतील.

मांडलिक देशांच्या असमतोल आर्थिक व्यवस्थेची माहिती असणाऱ्यांना मंदीमुळें त्यांच्या उडालेल्या आर्थिक बोजवाऱ्यामुळें आश्चर्य वाटण्याचें कारण नव्हतें. परंतु सार्वभौम राष्ट्रांना मात्र त्यामुळें आश्चर्याचा धक्का बसला यांत संशय नाहीं. जागतिक मंदीमुळें मांडलिक देशांत निर्माण झालेल्या परिस्थितींत सार्वभौम राष्ट्रांना त्यासंबंधीं अधिक क्रियाशील धोरण स्वीकारणें प्राप्तच झालें. १९२९ मध्यें ब्रिटिश पार्लमेंटनें एक कायदा पास करून त्या अन्वयें मांडलिक देशांमधील शेतकी व औद्योगिक विकासाच्या योजना आंखून पूर्ण करण्यासाठीं दरवर्षीं १० लक्ष पौंड इंग्लंडनें खर्च करावे असें ठरविलें. १९३९ पर्यंत अशा प्रकारच्या योजनांवर इंग्लंडनें एकंदर १½ कोटी पौंड खर्च केले. याशिवाय या देशांच्या अंदाजपत्रकांतील तूट भरून काढण्यासाठीं म्हणून या दहा वर्षांत इंग्लंडनें एक कोट वीस लक्ष पौंड दिले. तथापि मांडलिक देशांच्या एकंदर गरजेच्या मानानें ही सर्व रक्कम अगदींच तुटपुंजी होती. शिवाय हे पैसे खर्च करण्यांत इंग्लंडनें हातचा राखला होताच. ह्या देशांतून इंग्लंडचा व्यापार अधिक वाढावा हा या योजनेमागें प्रमुख हेतु होता.

दुसऱ्या महायुद्धाच्या वावटळींत इंग्लंडनें मांडलिक देशांच्या प्रगतीच्या दृष्टीनें आणखी एक पाऊल पुढें टाकलें. १९४० सालीं ब्रिटिश सरकारनें मांडलिक देशांसंबंधीं एक जाहीरनामा काढला. "मांडलिक देशांतील लोकांच्या कल्याणाची आम्हांवर जबाबदारी आहे. आम्ही त्यांचे विश्वस्त आहों.

२.

| वर्ष | करवसूली (डॉलर्स) | खर्च | निर्यात | आयात. |
|---|---|---|---|---|
| १९२७ | १०५,४०४ | ९३,२६४ | ३३९,९२६ | १७८,१६१ |
| १९२९ | ८१,८०० | ८४,६६१ | ३४९,०१३ | २०१,३९३ |
| १९३१ | ५२,३४९ | ६२,१६३ | १२५,१७७ | १०६,२०१ |
| १९३३ | ४७,१९९ | ५०,२५९ | १११,८८६ | ६७,१२९ |
| १९३४ | ५८,९२६ | ४७,२११ | २०२,७२५ | ८४,७३१ |



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तेथील लोकांची सर्वांगीण उन्नति करणें हें आमच्या धोरणाचें मुख्य सूत्र आहे व त्यासाठीं आम्ही बराचसा खर्चाचा वांटा उचलण्यास तयार आहों." असें त्यांत म्हटलें होतें. या कार्यासाठीं दरवर्षी ५० लक्ष पौंड याप्रमाणें १० वर्षे खर्च करण्याचा निर्णय घेण्यांत आला. शिवाय इंग्लंडनें मांडलिक देशांना दिलेल्या कर्जापैकीं १०० लक्ष पौंडांचें कर्ज माफ करण्यांत आलें. वरील योजनेबरहुकूम १९४४ मार्चपर्यंत ८० लक्ष पौंड त्या खातीं खर्च पडले होते. युद्ध संपल्यानंतर अधिक उदार धोरण आंखण्यांत आलें. त्याअन्वयें या देशांतून राजकीय सुधारणा अधिक जोमानें करण्याचा उपक्रम करण्यांत आला. मलायामध्यें नवीन लोकशाही घटना निर्माण करण्याचें ठरलें. हिंदुस्थान, ब्रह्मदेश व लंका यांना संपूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलें. मलायालाहि स्वायत्त वसाहतींचा राजकीय दर्जा यथाक्रम देण्यांत येईल असें नुकतेंच जाहीर करण्यांत आलें आहे.

## इंडोनेशिया : मांडलिकत्वाकडून स्वातंत्र्याकडे

मांडलिक देशांसंबंधीं डच सरकारचें धोरण आरंभीं कोणत्या प्रकारचें होतें याची कल्पना इंडोनेशियांत त्या सरकारनें सुरू केलेल्या सक्तीच्या उत्पादन-योजनेवरून येते. यासंबंधीं पूर्वीच्या लेखांत[३] विस्तारानें लिहिलें असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं. हॉलंडमधील उदारमतवादी पक्षानें ही योजना बंद केली व १८७० च्या सुमारास इंडोनेशियासंबंधीं अधिक उदार धोरण स्वीकारलें. इंडोनेशियांतील सामान्य जनतेचें संरक्षण करणें हें या धोरणाचें मुख्य सूत्र होतें. यासाठीं तीन गोष्टी मुख्यतः करण्यांत आल्या. सरकारतर्फे केलें जाणारें उत्पादन बंद करून खासगी उद्योगधंद्यांस सर्वंल उत्तेजन देण्यांत आलें. खाजगी उद्योगधंद्यांच्या जमान्यांत भांडवलवाल्यांनीं मजूर व इतर जनतेवर जुलूम करूं नये यासाठीं, सरकारी अधिकाऱ्यांना देखरेखीचे वगैरे अधिकार देण्यांत आले. तद्देशीय ग्रामव्यवस्था विघटित न होईल अशा प्रकारें राज्यकारभार चालविण्याचें ठरलें. त्यामुळें खेडेगांवांतील जनतेस संरक्षण मिळेल अशी अपेक्षा होती. पुढें ती फारशी फलद्रूप झाली नाहीं हें वेगळें. त्याचप्रमाणें जमिनीची मालकी शक्य तोंवर तद्देशीय जनतेच्या हातून जाऊं नये अशा प्रकारचे कायदे करण्यांत आले.

हें नवीन धोरण १८७० ते १९०० पर्यंतच्या काळांत चालूं होतें. तथापि त्यामुळें फारशी प्रगति होऊं शकली नाहीं. १८८३–८५ मध्यें आर्थिक मंदीची लाट आली. १८९५ मध्यें त्याची पुनरावृत्ति झाली व इंडोनेशियन जनतेचें दारिद्र्य वाढतच गेलें. अशा परिस्थितींत डच सरकारनें अधिक क्रियाशील धोरण पत्करण्याचें ठरविलें. जनतेचें नुसतें संरक्षण न करतां त्याबरोबरच त्यांच्या आर्थिक उन्नतीसाठीं सरकारनें उद्योग केला पाहिजे हा नवीन धोरणाचा पाया होता. २० व्या शतकाच्या सुरुवातीस ह्या धोरणाचा अंगीकार करण्यांत आला. "कृष्णवर्णीयांना सुसंस्कृत करण्याचा श्वेतवर्णीयांच्या डोक्यावर फार मोठा बोजा आहे" अशाप्रकारची इंग्लंडमध्यें किपलिंगनें जी मतप्रणालि सुरु केली त्याचाच बऱ्याच अंशीं प्रतिध्वनि या धोरणांत उमटलेला दिसतो. या धोरणानुरूप आर्थिक प्रगतीसाठीं औद्योगीकरणास मदत

---

३. 'नवभारत' मार्च १९४९ च्या अंकांतील लेख.

आश्चर्याची गोष्ट अशी कीं डचसरकारची आर्थिक शोषणाची ही योजना हिंदी अर्थशास्त्राचे प्रणेते न्यायमूर्ति रानडे यांना फार पसंत पडली होती. आर्थिक उत्पादनासंबंधीं डच सरकारनें क्रियाशील धोरण स्वीकारलें होतें तेवढेंच लक्षांत घेऊन तशा प्रकारचें धोरण हिंदुस्थानांत ब्रिटिश सरकारनें ठेवावें असें न्यायमूर्तींनीं आपल्या एका लेखांत प्रतिपादिलें आहे. डच सरकारच्या वरील योजनेमुळें तेथील जनतेचे किती हाल झाले याची दखल न्यायमूर्तींना असती तर त्यांनीं असें प्रतिपादन केलें नसतें हें उघड आहे. डच सरकारनें प्रसिद्धिलेल्या एका अहवालावर सर्वस्वीं हवाला ठेवून न्यायमूर्तींनीं तसें प्रतिपादन केलें असें दिसतें. प्रत्येक विषयाचा सर्वांगीण अभ्यास करून त्यासंबंधीं आपलीं मतें बनविण्याबद्दल न्यायमूर्तींचा लौकिक होता. सदरहू लिखाण वरील नियमास अपवादात्मकच म्हटलें पाहिजे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

करण्यांत येऊं लागली. सामाजिक व राजकीय प्रगतीसाठीं ग्रामपंचायतीसारख्या संस्था सरकारमार्फत सुरू करण्यांत आल्या. त्यासाठीं १९०६ मध्यें एक कायदा करण्यांत आला. पुढील ८–१० वर्षांच्या काळांत इंडोनेशियांतील राजकीय चळवळीनेंहि जोर धरला व १९१७ मध्यें 'लोकसभा' स्थापन करण्यांत आली. व त्यांत तद्देशीय लोकांचे निम्मे प्रतिनिधी घेण्यांत आले होते.

१९२९ च्या जागतिक मंदींत डच धोरण आणखी बदललें. या काळांत डचांनीं जास्त नियोजित स्वरूपाचें आर्थिक धोरण स्वीकारलें. इंडोनेशियांतील तांदुळाची निपज वाढवून तेथें होणारी तांदुळाची आयात शक्य तेवढी कमी करणें हें या योजनेचें एक प्रमुख अंग होतें. या योजनेमुळें तांदुळाची आयात १९३० मध्यें ६ लक्ष टन होती १९३८सालीं ती ३ लक्ष टनांइतकी घटली. औद्योगीकरणास मदत करणें हेंहि नवीन धोरणाचें एक अंग होतें. लहान उद्योगधंद्यांना मदत देण्यासाठीं सरकारनें एक निधि निर्माण केला व १९३८ पर्यंत या निधीमार्फत १ लक्ष फ्लॉरी (१ फ्लॉ. = २ शिलिंग) इतकी मदत अशा उद्योगधंद्यांना मदत म्हणून देण्यांत आली. १९३६ मध्यें हॉलंडच्या सरकारनें इंडोनेशियाच्या सरकारला $२\frac{१}{२}$ कोटी फ्लॉरीन कर्जाऊ दिले. औद्योगीकरण, पाटबंधाऱ्यांची वाढ व सुधारणा, नवीन जमिनीवर वसाहती वगैरे योजनांसाठीं या पैशांतून खर्च व्हावयाचा होता. औद्योगिक व धंदेविषयक शिक्षणाचीहि एक विस्तृत योजना आंखण्यांत आली व तिचा अंमलहि करण्यांत आला. या मदतीमुळें लहान उद्योगधंद्यांची बरीच वाढ झाली. बाटिकचा[४] धंदा बराच वाढला. विणकर धंदेहि पुष्कळच वाढले. १९३२ सालीं विणकरांच्यासाठीं ५८८६ मेट्रिक टन इतकें सूत आयात होत असे. १९३९ मध्यें ही आयात २१,३२३ मेट्रिक टनांइतकी वाढलेली होती.

दुसऱ्या महायुद्धास सुरुवात होण्यापूर्वी इंडोनेशियामधील राष्ट्रीय चळवळ बरीच फोफावली होती. व राष्ट्रीय पुढारी स्वायत्ततेची मागणी जोरानें पुढें मांडीत होते. दुसऱ्या महायुद्धाच्या सुरुवातीसच हॉलंड जर्मनांनीं पादाक्रान्त केला व हॉलंडचें सरकार व राणी हीं निर्वासित झालीं. १९४१ च्या शेवटीं जपाननें युद्धांत पदार्पण केलें व थोड्याच दिवसांत इंडोनेशिया पादाक्रान्त केला. सार्वभौम व मांडलिक हे उभयताहि अशा रीतीनें जिंकले गेल्यामुळें समानपातळीवर येऊन आपापलें राजकारण करूं लागले. डिसेंबर १९४२ मध्यें निर्वासित डच सरकारनें एक घोषणा करून असें जाहीर केलें कीं 'इंडोनेशियांतील जनतेस युद्धानंतर अंतर्गत बाबतींत संपूर्ण स्वायत्तता देण्यांत येईल व डच साम्राज्यांत संपूर्ण भागीदारीचे हक्क त्यास देण्यांत येतील.' इकडे इंडोनेशीय पुढाऱ्यांनीं जपानच्या नेत्यांशीं संधान बांधलें व १९४५ मध्यें जपाननें इंडोनेशियास संपूर्ण स्वातंत्र्य (!) बहाल केलें! दोस्त राष्ट्रांनीं इंडोनेशिया व्यापल्यानंतर तेथें इंडोनेशियन लोकसत्ताक राज्याची स्थापना झाली. परंतु दोस्तांबरोबर डच सरकारहि इंडोनेशियास परतलें. त्या दोघांमधील झगडा परवांपर्यंत चालू होता. डच लोक मांडलिक देशावरील आपली राजकीय सत्ता खुषीनें सोडावयास बरेंच नाखूष होते. तथापि युद्धोत्तर कालाच्या परिस्थितींत त्यास पडतें घ्यावें लागलें व नुकताच इंडोनेशियास संपूर्ण स्वातंत्र्य देण्याचा करार इंडोनेशियन पुढारी व डच सरकार यांच्यामध्यें झाला आहे.

### फ्रेंचांचें मांडलिकविषयक धोरण

मांडलिक देशासंबंधींचें फ्रेंच सरकारचें धोरण प्रथमतः खुल्या व्यापाराचें व अनिर्बंध आर्थिक व्यवहाराचें होतें. परंतु त्यांत हळूंहळूं फेर पडला, व १८९२ मध्यें वसाहती आत्मसात् करण्याचें धोरण स्वीकारलें गेलें. फ्रेंच मांडलिकत्वाखालचे देश म्हणजे तो फ्रान्स देशाचा इतरत्र असलेला तुकडाच. जे कायदे फ्रान्समध्यें तेच त्या देशांतून. तेथें जी जकातीची पद्धति तीच इकडे. हें या धोरणाचें मुख्य तत्त्व होतें. मांडलिक राष्ट्रांतील लोकांना फ्रान्स हीच आपली मातृभूमि वाटली पाहिजे अशा प्रकारचा बंदोबस्त या धोरणाबरहुकूम करावयाचा होता

४ कापडावर विविध प्रकारचें रंगीत नक्षीकाम करण्याच्या पद्धतीचें नांव.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

या धोरणामुळें इंडोचीनमधील जनतेचें नुकसान झालें. फ्रान्स देशाच्या गरजांतून उत्पन्न झालेल्या जकाती व त्यांचे दर जसेच्या तसेच इंडोचीनमध्यें लावणें म्हणजे हत्तीचा पाय गाढवाला लावण्यापेक्षां जास्त शहाणपणाचें नव्हतें; त्यामुळें इंडोचीनची फार कुचंबणा झाली. १९०६ पासून हें धोरण बदललें पाहिजे असे प्रतिध्वनि फ्रान्समध्यें उमटूं लागले, व १९२८ सालीं जकाती ठरविण्याबाबत इंडोचीनला स्वातंत्र्य देण्यांत आलें. जागतिक मंदीच्या काळांत फ्रेंच सरकारनें निरनिराळ्या प्रकारें तद्देशीय उत्पादनास उत्तेजन व साहाय्य दिलें. त्याचप्रमाणें इंडोचीनमधील माल फ्रान्समध्यें जातांना त्यावर आकारल्या जाणाऱ्या जकातीचे दर पुष्कळ उतरविले. याचा परिणाम इंडोचीनचा व्यापार फ्रेंच बाजारपेठेंत जास्त केन्द्रित होण्यांत[5] झाला.

इंडोचीनमधील उद्योगधंद्यासहि या काळांत मदत करण्यांत आली. साखरेचें उत्पादन १९३० मध्यें ३००० मेट्रिक टन होतें तें १९३८ मध्यें १५,०६६ मेट्रिक टनांइतकें वाढलें. कच्च्या रबराचें संस्करण करण्याचे कारखानेहि या काळांत काढण्यांत आले. १९३८ पर्यंत प्रत्येक मळ्यांत असा कारखाना निघालेला होता.

आर्थिक मंदीमुळें तद्देशीय शेतकरी सावकारी पाशांत अधिकच अडकला व त्याच्यावरील कर्जाचा बोजा कित्येक पटींनीं वाढला. २० व्या शतकाच्या सुरवातीपासून इंडोचीनमध्यें हिंदुस्थानांतील चेट्टी सावकारांनीं आपले हातपाय पसरावयास सुरवात केली होती. इंडोचीनमधील कोचीनचायना भागांत चेट्टी सावकारांनीं आपले सावकारी व्यवहार सुरु केले व नंतर देशाच्या इतर भागांत आपलें जाळें पसरलें. नागरी भागाकडून ग्रामीण भागाकडे त्यांचा मोर्चा वळला.

१९०५–७ च्या दरम्यान तांदुळाचें पीक बुडाल्यामुळें इंडोचीनमधील शेतकऱ्यांस बऱ्याच मोठ्या प्रमाणावर कर्ज काढणें भाग पडलें व तें कर्ज या चेट्टी सावकारांनीं भरपूर प्रमाणांत पुरविलें. कर्जास तारण म्हणून अर्थातच शेतकऱ्यांच्या जमिनी त्यांनीं लिहून घेतल्या. यानंतरच्या काळांतहि शेतकरी कर्जबाजारीच राहिला व या जमिनी हळूंहळूं सावकारांच्या ताब्यांत येऊं लागल्या.

१९३४ च्या सुमारास कोचीनचायनामधील भातजमिनीपैकीं २५ टक्के जमीन या चेट्टी सावकारांच्या ताब्यांत आलेली होती. १८०० पासून १९३४ पर्यंत तद्देशीय शेतकऱ्यांनीं या चेट्टी सावकारांस एकंदरीनें १८·२ कोटी पिॲस्टर (Piastre = २ ते ६ पेन्स) इतकी रक्कम पोंचविली होती. यापैकीं सुमारें ४·२ कोटी पिॲस्टर इतकी रक्कम हिंदुस्थानांत पाठविण्यांत आली होती व सुमारें ४ कोटी पुन्हां इंडोचीनमधील आर्थिक व्यवहारांत गुंतविण्यांत आली होती. चेट्टी सावकार आपले व्यवहार सर्व प्रकारच्या नीच व दुष्ट साधनांच्या साहाय्यानें करीत असत व त्यांस नीतिमत्तेची बिलकुल चाड नसे. इंडोचीनमधील जनतेंत या सावकारांबद्दल आत्यंतिक तिरस्कार व द्वेष माजला होता व १९२९ नंतरच्या आर्थिक मंदीमुळें या भावना अगदीं शिगेला पोंचल्या. अशा परिस्थितींत तेथील फ्रेंच सरकारास या चेट्टी सावकारांविरुद्ध कडक उपाययोजना करणें भाग पडलें व एक कर्जनिवारण योजना आंखण्यांत आली. या योजनेनुसार कर्जांतील मुद्दल व व्याज हीं पुष्कळ कमी करण्यांत आलीं व अशा तऱ्हेनें कमी केलेल्या कर्जाच्या फेडीचीहि तात्पुरती तहकुबी देण्यांत आली. त्यामुळें चेट्टी सावकारांच्या अगदीं मर्मीं घाव बसला व

५ खालील आंकड्यांवरून हें स्पष्ट दिसून येईल :

| | १९११–२० | १९२१–३० | १९३१–३७ | १९३८ |
|---|---|---|---|---|
| इंडोचीनच्या एकंदर निर्गतीपैकीं फ्रान्सला जाणारा भाग (टक्के) | १९·६ | २०·९ | ४८·१ | ५३·० |
| इंडोचीनमध्यें एकंदर आयातीपैकीं फ्रान्सहून येणारा भाग (टक्के) | २९·६ | ४३·२ | ३७·१ | ५७·१ |



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांची चलबिचल झाली. यांतून निर्माण झालेल्या घबराटीमुळें इंडोचीनमधील निम्में हिंदी भांडवल काढून तें हिंदुस्थानांत परत आले असा अंदाज करण्यांत आला आहे. इंडोचीनमधील व्यापारांत चिनी लोकांचें असेंच प्रस्थ माजलें होतें. त्या विरुद्धहि तेथील सरकारनें कडक उपाययोजना याच वेळीं केली.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत मांडलिक देशास संपूर्णतया आत्मसात् करण्याचें घोरण फ्रेंच सरकारनें सोडून दिलें असें म्हणावयास हरकत नाहीं. तथापि त्या देशांना राजकीय सत्ता देण्यास फ्रेंच सरकार आजहि फारसें खूष आहे असें दिसत नाहीं.

### अमेरिकेचें वेगळें धोरण

अमेरिकेचें मांडलिक देशांसंबंधींचें धोरण आतांपर्यंत वर्णन केलेल्या तिन्ही साम्राज्यशाही राष्ट्रांपेक्षां अगदीं निराळें होतें असें फिलिपाईन बेटांमधील घटनांवरून दिसतें. फिलिपाईन बेटांचें आर्थिक शोषण करून त्याचा फायदा अमेरिकेस मिळण्याऐवजीं अमेरिकेनेंच आपल्या खर्चानें फिलिपिनो लोकांची आर्थिक, सामाजिक व राजकीय सुधारणा-करण्याचा बोजा उचललेला दिसतो. आणि त्याचें कारणहि उघड आहे. अमेरिकेच्या विपुल आणि स्वयंपूर्ण नैसर्गिक संपत्तीच्या मानानें फिलिपाइनची नैसर्गिक संपत्ति अगदीच निकृष्ट दर्जाची. अमेरिकेच्या मानानें त्यांचें क्षेत्रफळहि लहान. साधारणपणें अमेरिकेंत न होणारा कोणताच जिन्नस फिलिपाईनमध्यें होत नव्हता व होण्याची शक्यताहि नव्हती. अमेरिकन मालाशीं फिलिपाइनमध्यें होणाऱ्या मालाची चढाओढच होत असे. फिलिपाईनमध्यें कच्च्यामालाचें उत्पादन वाढून त्याच्या निर्गतीवर तेथील अर्थव्यवस्था अवलंबून होती हें मागील लेखांत सांगितलें आहे. याचें कारणसुद्धां मुख्यतः अमेरिकेच्या बाजारपेठेंत फिलिपाईनमध्यें पैदा झालेल्या मालास जकात द्यावी लागत नसे हेंच होय. त्यामुळें फिलिपाईनची अर्थव्यवस्था अमेरिकन बाजारपेठेवर सर्वस्वी अवलंबित अशा प्रकारची मात्र झाली. तथापि अमेरिकेच्या तेथील ३० वर्षांच्या कारकीर्दींत फिलिपाइनची राष्ट्रीय संपत्ति अगर उत्पादन ६ पटींनीं वाढलें. अमेरिकेनें स्वतःचा बराच पैसा खर्च करून फिलिपिनो जनतेस शिक्षण देण्यासाठीं खर्च केला. उदाहरणार्थ–१९२४ मध्यें इंडोनेशियांत दर माणशीं २४ सेंटस् व हिंदुस्थानांत दर माणशीं २७ सेंटस् शिक्षणासाठीं सरकारमार्फत खर्च होत होते. त्याच वर्षीं फिलिपाइनमध्यें शिक्षणावर दर माणशीं १३० सेंटस् खर्च झालेले आढळतात. १९३४ नंतरच्या काळांत फिलिपाइनमध्यें तयार झालेल्या साखरेची किंमत अमेरिकेखेरीज इतर देशांत तयार होणाऱ्या साखरेपेक्षां जास्त असूनसुद्धां जकातीच्या विशिष्ट व्यवस्थेमुळें अमेरिकन जनतेस ही जास्त किंमतीची साखर घेणें भाग पडे. यामुळें अमेरिकन जनतेस दर वर्षीं जवळजवळ ४ कोटी डॉलर जास्त खर्च करावे लागत. म्हणजे ते अप्रत्यक्ष-रीत्या फिलिपाईनला मिळत. शिवाय जकातीच्या माफीमुळें दरवर्षीं १·७ ते ४·६ कोटी डॉलर इतकें अमेरिकन सरकारचें नुकसान होई तें वेगळेंच. १९६६ मध्यें फिलिपाईनला १० वर्षांच्या मुदतींत संपूर्ण स्वातंत्र्य देण्याचा कायदा अमेरिकेनें केला. व युद्ध संपल्यानंतर १९४६ सालीं संपूर्ण स्वातंत्र्य देऊन अमेरिकेनें आपलें वचन पुरें केलें. युद्धकालांत झालेल्या आर्थिक नुकसानीमुळें फिलिपाईनमधील अर्थव्यवस्था कोलमडून पडूं नये व त्याच्या आर्थिक प्रगतीस मदत व्हावी यासाठीं फिलिपाइनमध्यें तयार झालेल्या मालास दीर्घकालपर्यंत ( १९७४ पर्यंत ) अमेरिकन बाजारपेठ खुली राहावी असा नवीन कायदा १९४६ मध्यें करण्यांत आला. या कायद्यामुळें फिलिपाईनची कच्च्या मालाच्या पैदाशीवर व निर्यातीवर अवलंबून असणारी अर्थव्यवस्था अधिक दीर्घकाळपर्यंत टिकेल व त्यामुळें त्याच्या आर्थिक प्रगतीस अडथळा होईल असें कांहीं फिलिपिनो गटांचें म्हणणें आहे.

त्याचप्रमाणें फिलिपाईनमधील विमान व नाविक तळ अमेरिकेनें आपल्या ताब्यांत ठेवले आहेत त्यासहि बऱ्याच फिलिपिनो लोकांचा विरोध आहे, तथापि अमेरिकेच्या मदतीशिवाय युद्धकालांतील नुकसान भरून काढून प्रगतीचा पुढील टप्पा गांठणें फिलिपाईनला अशक्य आहे हें बहुसंख्य फिलिपिनो जनतेस पटलेलें आहे. फिलिपाईनचे माजी अध्यक्ष रोक्सास् यांनीं यासाठींच वरील कायद्यास पाठिंबा दिला असावा असें वाटतें.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

श्री. बा. भ. बोरकर

# रक्ताचा निवाडा

गेले आठ, दहा दिवस आमचा दामू घरांत तापानें फणफणत होता. औषध चालू होतें, पण गुण नव्हता. आजीनें घरांत घाडी कुदवला[1] होता. देवीला नवचंडी आंगवली होती. आणि देवीचा कौल प्रसाद आणण्यासाठीं बाबांना पाठवलें होतें. रात्रीं ते घरीं आले तेव्हां तिनें विचारलें, 'काय सांगितलं पुजाऱ्यानं ?'

'समंधाची बाधा आहे म्हणे !' सचिंतपणें ते उद्गारले.

'तर मग घाल त्याच्या उरावर कोंबडं-बकरं आणि हो म्हणावं एकदाचा शान्त.'

इतकें बोलून आजी निघून गेल्यावर मी बाबांना म्हणालों, 'हा समंध कोण आणि आम्हांला तो कां त्रास देतो, बाबा ?'

'समंधाच्या गोष्टी मुलांना रात्रीच्या वेळीं सांगायच्या नसतात. सांगेन पुढं केव्हां तरी.' ते म्हणाले.

दुसरे दिवशीं ते जायला निघाले त्या वेळीं मीहि त्यांच्याबरोबर चलायचा हट्ट घेतला. त्यांनींहि विशेष आढेवेढे घेतले नाहींत. मी त्यांच्याबरोबर निघालों आणि घरामागचा डोंगर चढूं लागलों.

बरीचशी चढण चढून झाली होती आणि आतां आम्ही पायरस्त्यावर येऊन पोंचलों होतों.

माझ्यासारख्या दहा वर्षांच्या पोराला ही चढण तसें म्हटलें तर कष्टाची होती, पण आतांपर्यंत वेळीं अवेळीं मीं ती इतक्यांदा पायांखालीं घातली होती कीं तिचें मला कांहींच वाटलें नाहीं. शिवाय उन्हाळ्याच्या दिवसांत काजू आणि रानांबे यांनीं तो इतका फुलून गेलेला असावयाचा कीं उन्हांत देखील– किंबहुना उन्हांतच तो आम्हांला जास्तच आकर्षक वाटावा. कधीं उन्हांत चमचमणारे पिवळे, तांबडे बोंडू खात तर कधीं रानांब्यांची डिकाळ आंबूस गोडी चाखीत, कधीं गुराख्यांकडून मिळालेल्या कोवळ्या काजूगरांचा स्वाद घेत, तर कधीं झिरमुळ्यांची आणि चाराचुरणांची गोडी घेत मीं ही चढण ओलांडली होती. मुक्कामा–मुक्कामाला डोंगरांतलें सृष्टिवैभव आणि गांवचा खालीं पसरलेला विस्तार, शेतां-खांचऱ्यांतून रुपेरी अजगरासारखा सुस्तपणें वळणें घेणारा नदीचा पाट आणि त्याच्या अलीकडे दाटलेली माडांची हिरवीगार राई हें सर्व पहातां पहातां मिळणाऱ्या संतोषांतून वाटचालीचे शीण जवळजवळ मावळून गेले होते. ऊन आतां बरेंच चढलें होतें. आणि घामानें अंग चिकचिकलें होतें. ज्यांना परिचय आहे त्यांना सांगायला नकोच कीं डोंगर चढण्यांत एक प्रकारचा कैफ असतो. आणि बाळमनाला तर तो प्रिय असतो. मला आतां अजूनहि थोडी चढण चढावी असें वाटूं लागलें होतें. पण इतक्यांतच पायरस्ता आल्यामुळें माझा थोडासा विरस झाला. म्हणून मी वडिलांना म्हणालों,

'अजून थोडी चढण राहिली असती तर किती बरें झालें असतें !'

यावर बाबा म्हणाले—'चांगल्या गोष्टीच्या कैफापासून देखील माणसानें सावध असावयाला

१ घाडी कुदवणें = भगत घुमविण्याचा कोंकणांतील एक प्रकार.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहिजे. आमच्या घरच्या मुलांनीं तर विशेषच.'

एकादें सुभाषित बोलावें तसें बोलून ते एकदम चूप झाले आणि वाट चालूं लागले. मीं ओळखलें कीं ते कसल्या तरी विचारांत निमग्न झाले आहेत. मला त्यांच्या मनांतील विचारांचा कांहीं अंदाज होईना, पण माझ्या छांदिष्टपणाशीं, माझ्या अति उत्साही वृत्तीशीं त्याचा कांहीं तरी संबंध असावा असें मात्र मला वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. म्हणून माझें कुठें चुकलें याचा मीहि विचार करूं लागलों. किती तरी वेळ आम्ही दोघेहि मुकाट्यानें चाललों होतों.

आतां पायरस्त्याला वळण लागलें आणि एका निमुळत्या नागमोडी पायवाटेनें आम्ही डोंगर उतरूं लागलों. दहा वीस पावलें चालून झालीं नाहींत तोंच गोड गारवा जाणवला आणि त्याच्या स्पर्शासरशीं ऐन दुपारींच पहांट उगवली असा भास झाला. घामानें चिकचिकलेलें अंग स्नानानंतरच्या तरतरीनें तरारून निघालें. आणि कुळागराचा हिरवागार देखावा डोळ्यांपुढें प्रगट झाला. एकेका पावलाबरोबर त्याची शोभा उलगडत जाऊं लागली. कुळागरांतून खळखळणारें आणि कुणग्याकुणग्यांतून उड्या टाकणारे स्वच्छ पाण्याचे पाट दृष्टिश्रुतीला सुखवूं लागले. त्यांच्या लयबद्ध घोषामुळें पोफळींचे सहस्रावधि शुभ्र खांब रोमांचित होऊन थरथरत आहेत असें वाटत होतें. त्यांचीं झावळें जणूं काय लवचिक हिरव्या कांचेची बनविली आहेत असा भास होई आणि त्यांच्यावर सांडलेलें तुरळक ऊन चांदण्यासारखें सौम्य होऊन पाण्याप्रमाणें ठिबकत आहे असें वाटूं लागे. मधूनच एखादी झुळूक कसलेल्या गवयाच्या हुकमी तानेप्रमाणें साऱ्या आसमंताला वेढून जाई. त्यांत इतक्या विविध फळां-फुलांचे दरवळ मिसळलेले असत कीं घ्राणेंद्रिया-बरोबर रसनेंद्रियहि प्रफुल्लित होऊन उठे. आम्ही आणखी दोन पावलें चालून खालीं आलों. अनन-साची जाळी ओलांडतांना तिची एक कांटेरी पात माझ्या डाव्या हाताला चाटून गेली होती. आणि त्यामुळें थोडेसें रक्तहि निघालें होतें. पण वेदनेपेक्षां मला उन्मादच अधिक जाणवला होता. डोंगर चढतां-उतरतांना, रानजाळ्यांतून वाट काढतांना किंवा असाच दुसरा एखादा धोका पत्करतांना आपलें रक्त निघालेलें दिसलें म्हणजे त्या बालवयांत केवढा उत्साह, केवढा उन्माद, केवढा पुरुषार्थ वाटतो! मनगटांतून निघालेले रक्ताचे ते बारीक कण क्षण दोन क्षण पाहून घेतल्यावर सहज माझी नजर उजवीकडे गेली. तेथें गुलाल सांडला होता. जणूं आजीच्या गोष्टींतील स्वर्गांतल्या परी रात्रीं तिथें नाचून गेल्या होत्या आणि त्यांच्या पावलांचा अळिता तिथें आपल्या मोहमुद्रा ठेवून गेल्या होत्या. जांभांच्या झाडाच्या पायथ्याशीं ही अशी त्यांच्या पुष्पकेसरांची रास पडली होती.

—' किती सुंदर आहे नाहीं? कुणाचं बाबा हें कुळागर?'

—'आपलंच. याला निरंकाल म्हणतात.'

—' निरंकाल म्हणजे काय?'

—'' निराकार' याचा हा अपभ्रंश. समाईक मालकीची देवाधर्माला सोडलेलीं जीं ठिकाणं असतात त्यांना निरंकाल म्हणतात.'

—' तरीच या ठिकाणाचा 'खंड' आपल्या-कडे येत नाहीं. पण आपण हें देवाधर्माला कां सोडलं? कुळागर तर मोठं भरभराटीचं दिसतंय.'

—' ती एक मोठीच कथा आहे. या कुळाग-रांतल्या लोकांनीं तुला कांहीं खायला प्यायला दिलं तर घेऊं नकोस बरं का.'

वडिलांच्या या उद्गारांनीं मला फटका बसल्या-सारखें झालें, कारण मुलांच्या गालासारखे शुभ्र तांबूस जांब पाहून मला त्यांचा लोभ सुटला होता.

' खाल्लं तर काय होईल?'

' इथलं आम्ही कांहीं घेत नाहीं, तरी तो आम्हांला छळतो आहे. मग तर त्याच्या उपद्रवाला सीमाच उरणार नाहीं.'

स्वतःच्याच मनाशीं बोलल्याप्रमाणें ते बोलत होते. आतां माझी अधीरता तुटण्याच्या बेतांत आली होती.

' मग सांगाच मला ती गोष्ट. आत्तांच इथंच.'

' जरा थांब; आधीं इथल्या गांवड्याला बोला-वून घेऊन आमच्या समंधाची व्यवस्था लावतों; आणि तो तिथं चिमकुला तलाव दिसतो ना तिथं बसायला जागा फार चांगली आहे; तिथून सगळं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कुळागर दिसतं, तिथं जाऊन बसूं; नंतर सांगतों तुला सगळी हकीकत.' कोंबड्या—बकऱ्यांसाठीं बाबांनीं गांवड्याच्या हातीं पैसे दिले. दामूला गुण पडण्यासाठीं करावयाची आंगवाण सांगितली आणि मग मला घेऊन ते तलावावर जाऊन बसले. बाबांची गोष्ट सुरू झाली :

"या गोष्टीला तीन-चारशांहून अधिक वर्षें खाचित झालीं असतील. त्या वेळीं आजच्यासारखीं आमच्या कुटुंबाचीं अशीं घरं झालीं नव्हतीं कीं पांगापांग झाली नव्हती. सगळ्या कुटुंबाचा, सात माड्यांचा एक भला मोठा वाडा होता. राज्य कुणाचं होतं कुणाला माहीत, पण गावांत खरं राज्य होतं तें आमचं. गांवांतल्या सगळ्या तक्रारींचा निवाडा होत असे तो आमच्या सदरेवर. ग्रामसंस्थेच्या उत्पन्नाची जमाबंदी आणि वांटणी होत असे तीहि आमच्याच राजांगणांत. गांवचा सारा सुभेदाराला देण्यांत येई तोहि तिथंच आणि सगळ्या गांवाला उत्सवानिमित्त जेवणावळी पडत त्याहि आमच्याच चौसोपीवर. घरचे कर्ते पुरुष सोनबा यांच्या शब्दाला कायद्यापेक्षांहि गांवांत अधिक मान होता आणि त्यांच्या शब्दावर सारा गांव डुलत होता. त्यामुळेंच गांवाची एवढी भरभराट होती. अंत्रुजमहालाच्या सत्तावीस गांवांत त्यांचा विडा पहिला होता. आणि त्यांची गुढी शिमग्याच्या मेळ्यांत पहिली असे.

"पुढें केव्हां तरी राज्याचा उलथापालथीचा काळ आला. आणि राज्यांच्या आणि मुलुखगिऱ्यांच्या धाडी मधून मधून गांवांवर होऊं लागल्या. गांव मुख्यतः भटागांवड्यांचा. महारासारखं राबावं आणि राजासारखं खावं असाच सगळ्यांचा शिरस्ता. दिवाण, दरबार किंवा राजकाजाच्या भानगडी यांची त्यांना गंधवार्ता नसे. ती सारी जबाबदारी उचलावी आमच्या घरानें. आम्हीं सागूं तें इमानें इतबारें पाळावें हें त्यांचं काम.

"जसजशा या धाडी येऊं लागल्या आणि गांवचं जीवन बिनसूं लागलं तसतशी गांवकऱ्यांत अस्वस्थता पसरूं लागली. सोनबांच्या सदरेवरून दिवाणांत कागदपत्रें जात होतीं. पण या धाडींच्या बंदोबस्ताची कोणतीच व्यवस्था अजून सरकारतर्फें होत नव्हती. गांव सरकार जाणत नव्हतें; त्याच्या दृष्टीनें सरकार काय तें सोनबा. एवढेंच काय सरकारपेक्षांहि सोनबांचें सामर्थ्य मोठें अशी गांवच्या लोकांची भावना. कारण सोनबा म्हणजे नेकीचा माणूस. भक्तीचा, श्रद्धेचा अखंड जाळणारा होमांतला अग्नि. मध्यरात्रींच्या वेळी पांढऱ्या घोड्यावरून गांवचा पहारा करणारा आमचा कुलदेव त्याला दिसतो, त्याच्याशीं बोलतो, त्याच्या सांगण्याची कदर करतो, संकटकाळीं त्याच्या हांकेला 'ओ' देतो, त्याच्या घरीं नोकरासारखा राबतो अशी त्यांची श्रद्धा. मग हीं अशीं संकटें येतात कशीं ? हें असें मुलुखावेगळें घडतें कसें ? त्यांना कांहीं या सगळ्याचा बोधच होईना. शेवटीं एक दिवस वयांत आलेल्या गांवच्या सगळ्या पुरुषांना सदरेवरून बोलावणें आलें. ठरलेल्या वेळीं लोक जमले. सदर आणि चौसोप्या भरून गेल्या. आपल्याला कशासाठीं बोलावलेलें आहे याची कुणालाच कल्पना नव्हती. तरीदेखील ज्यावरून सगळ्या गांवाला बोलावणें आहे त्यावरून कसल्या तरी गंभीर प्रसंगाला तोंड द्यायचें आहे एवढी खूणगांठ गांवकऱ्यांनीं मनाशीं बांधली होती. आणि जीव डोळ्यांत आणून सगळे लोक सोनबांच्या आगमनाची आणि त्यांच्या बोलण्याची वाट पहात होते. सदरेवर भिंतीला टेकून सोनबांची बैठक आणि लोड ठेवलेले होते, पुढें दोन समया जळत होत्या. गांवांतली वरिष्ठ मंडळी आणि आमच्या घरचे पुरुष बैठकीभोंवतीं बसले होते.

"इतक्यांत हातांत नारळ घेऊन अंगाला भस्म लावलेले सोनबा देवघरांतून बाहेर आले. आणि त्यांच्यासाठीं मोकळ्या सोडलेल्या वाटेनें बैठकीवर येऊन उभे राहिले. आज त्यांनीं लोकांना पाहून नेहमींसारखें स्मित केलें नाहीं. त्यांचा मूळचा उग्र चेहरा कपाळींच्या भस्मामुळें जास्तच उग्र दिसत होता. त्यांत अंतःकरणांत पेटलेल्या अग्नीच्या प्रकाशामुळें त्यांच्या गोऱ्या चेहऱ्याला लकाकी आली होती. आणि कपाळावरची शीर सणसणून उठलेली दिसत होती. आपल्या धीरोदात्त पण तिखट नजरेनें त्यांनीं सारा समुदाय पाहून घेतला. त्या तिखट दृष्टीच्या स्पर्शा-









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सरशीं अस्ताव्यस्तपणें बसलेले लोक नीट सांवरून बसले. त्यांच्या वांकलेल्या पाठी आणि माना ताठ झाल्या आणि प्राणायामाला बसल्याप्रमाणें सगळी सभा श्वास घेऊन तटस्थ झाली; सोनबा बोलूं लागले :

" ' लोक हो, वखत मोठा वाईट आला आहे. बायको आणतो त्याला ती राखतां आली पाहिजे. शेत पिकवतो त्याच्या मनगटांत पीक लुबाडूं न देण्याची धमक पाहिजे. गांव चालवतो त्याला तो सांभाळतां आला पाहिजे. पांच हजार लोकांच्या या गांवांत पांचपन्नास लोक येऊन धुमाकूळ घालतात, पिकवलेलं लुटून नेतात, बायका-मुलींना घराबाहेर पडण्याची चोरी होते याचा अर्थ काय ? सरकार किती हजार मैलांवर आहे कोण जाणें ! आपली हांक त्यांच्या कानापर्यंत जायला जो काळ लागेल तेवढ्यांत आमचें सर्वस्वहि जायचं. चीजवस्त, धनदौलत जाते तें कांहींच नव्हे पण गांवची लाज जाते हें अधिक. गांवावर धाड घालतात ते आमचे शत्रू तसे सरकारचेहि शत्रू. अशा पांच पांच हजारांच्या गांवावर पन्नासा-पन्नासांच्या टोळ्या हुकमत गाजवूं लागल्या तर सरकार तरी कुणाच्या धीरावर त्यांचें पारिपत्य करणार ? आणि करावें म्हटलें तरी त्याला कसें शक्य होणार ? शिवाय जोपर्यंत तुम्ही सत्तावीस गांवचा तुरा लावून मिरवतां आहांत तोपर्यंत इतरांच्या आधीं त्यानें तुमच्या हांकेला काय म्हणून ओ द्यावी ? प्रसंग पडला तर शिपाई होतो तोच खरा शेतकरी ! आज तसा प्रसंग आला आहे. प्रत्येक घरानं एक एक शिपाई दिला पाहिजे. तो केवळ नग नको. दिलाचा सच्चा आणि मरणाचा भोक्ता असा असेल तो पाहिजे. माझ्या घरच्या पोरानं हा नारळ उचलावा आणि मरणाचं मुखत्यारपण घ्यावं, घराचा शिरस्ता पाळावा अशी माझी इच्छा आहे; नव्हे तसा कुलदेवाचा हुकूम आहे. जो पुढें येईल तो मरायला सगळ्यांच्या पुढें नि जेवायला सगळ्यांच्या नंतर असा पाहिजे. बोला हर हर महादेव !'

" सगळ्या समुदायांतून सहस्रगुणित होऊन तोच 'हर हर महादेव ' महाध्वनि होऊन उमटला. आणि डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच आमच्याच घरचा जवान गोंदबा सोनबांच्या पुढें हात जोडून उभा राहिला.

" गोंदबाच्या मनगटाचा जोर सगळ्यांना माहीत होता. कोयत्याच्या एका घावासरशीं बारा फण्याच्या घडाची केळ कापून टाकणें हा त्याचा हातचा मळ होता. देवीच्या दिवसांत तोडकें[२] काढून घेतांना त्यानें कधीं हाय म्हटलेलें नव्हतें. गांवच्या देवळाच्या दशावतारी खेळांत रावणाचें सोंग घेण्याची हिंमत त्याच्याशिवाय अन्य कुणांत नव्हती. लांकडाची अकाळविक्राळ नऊ तोंडें तो शेंडीइतक्या सहजतेनें पेलीत असे. वीरभद्राचें सोंग घेऊन सगळी रात्र थयथयाट करीत, बायकापोरांच्याच काय पण वस्ताद शिकाऱ्यांच्यादेखील तो काळजाचें पाणी करीत असे. चार पुरुष उंचीच्या झाडावरून पाय निसटून पडलेला तरणाबांड माणूस त्यानें धीर देऊन भुजांवर झेलला होता. शिकारींत जखमी होऊन निपचित पडलेला मृग मेला असल्याच्या समजुतीनें त्यानें धरला असतांना अवचितपणें तो चवताळला, तेव्हां शिकाऱ्याची दुसरी गोळी येईपर्यंत त्यानें त्याला घट्ट पकडून धरलें होतें. गोंदबाच्या पराक्रमाच्या असल्या कितीतरी कथा गांवच्या लोकांच्या अंतःकरणांत आदर आणि भीतीच्या छिनी—हातोड्यांनीं कोरल्या गेल्या होत्या.

" गोंदबा समोर उभा असलेला पाहून वृद्ध सोनबांची दणकट छाती अभिमानानें फुलून आली. सगळ्या घराण्याचें वात्सल्य—उभ्या गांवची माया त्यांच्या हृदयांत उफाळून उठली. गोंदबा हा त्यांच्या एका लांबच्या चुलतभावाचा एकुलता एक मुलगा. पण त्यांना घरचीं सारीं मुलें सारखीं. हा लांबचा आणि हा जवळचा हा भेदभाव त्यांच्या ठिकाणीं नव्हता. उलट पोटच्या मुलाला लांब ठेवून लांबच्यांच्या मुलाचे लाड करावे हीच तर घराची रीत होती. गोंदबा तर लहानपणापासून जसा हूड तसा शूर. त्यामुळें सोनबांची त्याच्यावर विशेष मर्जी होती. त्यांनींच त्याला उरापोटावर घालून वाढवलें

---

२ तोडकें काढणें = देवी टोचण्याचा एक जुना प्रकार.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होतं. अर्थात् ही सारी मायाममता अंतःकरणांत दाटून येऊन त्यांच्या डोळ्यांच्या कडांवर उभी राहिली—पण क्षण दोन क्षणच. लगेच कुलपुरुषाचा करारीपणा, गांवच्या पंचिष्टांची न्यायबुद्धि, परंपरेची नेकदानत त्यांच्या ठिकाणीं जागी झाली. आणि आवाजाचा ओलावा सत्यनिष्ठेनें पुसून घेऊन तळपणाऱ्या तलवारीसारख्या धारदार स्वरांत ते म्हणाले :

" ' शस्त्र ही वस्तु विस्तवापेक्षांहि जोखमीची आहे, गोंदबा काबूंत राहिली तर हिताची नाहीं तर भयंकर—मोठी भयंकर. शस्त्राला एकदांची रक्ताची चट लागली म्हणजे हें वाघाचें रक्त अन् तें गाईचें रक्त हा विवेक त्याला रहात नाहीं. तें धरणाऱ्याच्या मनगटांत गोविंदाचें अधिष्ठान नसेल तर तें अंगावर उलटतें—नरकाला नेतें. ब्राह्मणानें तर या बाबतींत जास्तच सावध असलें पाहिजे. नाहीं तर त्याचा परशुराम तरी होतो किंवा अश्वत्थामा तरी होतो ! म्हणून शस्त्र हातीं धरतांना क्षणोक्षणीं या नारळाचं—या ईश्वरी आदेशाचं, मांगल्याचं, सत्यनीतीचं सदैव स्मरण ठेवीत रहा. आमचा कुलदेव जितका भोळा तितकाच भयंकर आहे. आज त्यानें खुष होऊन तुझ्या हातीं हा नारळ दिला आहे. पण जरा कुठें त्याच्या पावित्र्याला धक्का लागूं दिलास तर तो तेवढ्यांत कोपानें शासन करील हें विसरूं नकोस. '

" इतकें बोलून सोनबांनीं नारळ गोंदबाच्या हातीं दिला आणि त्याच्यावरचें भस्म स्वतःच्या हातानें त्याच्या कपाळाला लावलें. आणि त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हटलें :

" ' जा, तुझे भाईबंद निवड. आणि देवाची बिभूत त्यांच्या कपाळीं लावून गांवची फौज तयार कर. सगळ्या वाटा रोखून धरून देवासारखी गांवची राखण कर. अपराध्याची मुळींच गय करूं नकोस. पण कारणाशिवाय शस्त्राला रक्त पाजूं नकोस. चल, देव तुझ्या पाठीशीं आहे. '

" त्याचप्रमाणें गांवच्या जवानांची फौज तयार झाली. शस्त्रांना धारा चढल्या. धांवें रोखलीं गेलीं. गस्ता चालूं झाल्या. लोक निश्चिंतपणें आपापल्या उद्योगाला लागले आणि पूर्वींसारख्याच मध्यरात्रीला कुलदेवाच्या घोड्याच्या टापा ऐकूं येऊं लागल्या.

" गोंदबा आणि त्याचे साथीदार आपापलें काम चोख बजावूं लागले. गांवांत त्यांची पत वाढली. युद्धकाळांत शिपायाला मिळणारा मान त्यांना मिळूं लागला. गांवचे म्हातारे-कोतारेदेखील त्यांच्याशीं अदबीनें वागूं लागले.

" गांवचा पहारा अगदीं जागता होता; तरीहि दर आठपंधरा दिवसांच्या अंतरानें गोंदबांच्या आणि धाडकऱ्यांच्या दोन-चार चकमका उडाल्या. उभयपक्षीं रक्ताचे पाट निघाले. कांहीं माणसेंहि कामास आलीं. शेवटच्या चकमकींत तर शत्रूंनीं चांगलाच पराक्रम दाखविला. गोंदबाचे लोक संख्येनें जास्त नसते तर त्यांचा पराभव ठरलेला होता. तरीहि त्यांनीं आपल्यापुरती शर्थ केलीच होती. पण या यशानें त्यांचें समाधान होईना. शत्रूच्या पराक्रमानें तो दिपून गेला होता. आणि तो आपल्यालाहि साधला पाहिजे अशी त्याच्या मनानें पैज घेतली होती. टोळीवाले कांहीं झालें तरी तयार लोक होते. पण असल्या युक्तिवादानें पड घ्यायला गोंदबा कबूल नव्हता. त्यानें आपल्या साथीदारांना बोलावून सभा घेतली. सुरुवातीला पराभव पावलेल्या आपल्या शत्रूची दिलदारपणें स्तुति केली आणि तो त्यांना म्हणाला : ' आपण नाना युक्त्याप्रयुक्त्या योजून त्यांच्यांत गेलं पाहिजे. ते कसे जगतात, कसे वागतात, आपल्या पोरांना कोणती शिकवण देतात वगैरे खडान् खडा माहिती आपण काढली पाहिजे आणि त्यांच्या पराक्रमाचें मूळ कोणत्या गोष्टींत आहे याचा तलास काढून आपण तशी देख आपणाला दिली पाहिजे.'

" गोंदबाच्या इषाऱ्याप्रमाणें याहि कामाला सुरुवात झाली. थोड्याच दिवसांत कितीतरी गोष्टी गोंदबाच्या लेखीं गोळा झाल्या. एकाच घावांत ते लोक बकऱ्याचा काट कसा करतात, ताज्या रक्तांत चरू कालवून त्याचे घांस मिटक्या मारीत सगळे कसे खातात, चौरंगी काट करणाऱ्याशिवाय ते दुसरा नायक कसे जुमानीत नाहींत, नुकत्याच कापलेल्या बकऱ्याचा कंठनाळ तोंडाला लावून तें सगळें रक्त पचवण्यासाठीं अंगांतून घाम निघेपर्यंत तो कसा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विजेसारखा पळत राहतो वगैरे किती तरी गोष्टी गोंदबाच्या कानीं आल्या.

"'चौरंगी काट हा काय प्रकार आहे?' गोंदबानें आपल्या साथीदारांना विचारलें.

"'डाव्या बाजूला तोंड करून बकरं उभं केलेलं असतं, मागच्या पायावरून वार करून एका झटक्यासरशीं त्याचे पाय आणि मुंडकं तोडावयाचं असतं. पाय मोडून आणि तोंड जमिनीला लावून बकरं निश्चल बसलं आहे असा भास जो घडवतो त्याचा काट सर्वांत उत्तम!' साथीदारांनीं उत्तर दिलें.

"गोंदबाच्या नजरेपुढें तो काट मूर्तिमंत उभा झाला. त्या अर्धवर्तुळाकृति वाराची शिताफी त्याला जितकी आकर्षक, तितकीच स्तिमित करणारी वाटली. त्या रक्ताच्या कथा दिवसरात्र त्याच्या मनांत थैमान घालूं लागल्या. त्याच्या रक्ताला रक्ताचा कैफ चढूं लागला. संवय म्हणून पूजेला लावलेल्या नारळाला तो नमस्कार करीत होता खरा. पण त्याच्या मनांत रक्ताचीच पूजा चालली होती. चौरंगी काटाचा तो वार सारखा त्याच्या डोळ्यांना संथा देत होता. त्याच्याहून अधिक रमणीय, अधिक विक्रमशील कांहीं असूं शकेल याची त्याला आतां शुद्ध राहिली नव्हती. गरीब बकरं फुकट प्राणाला मुकत आहे हें तो केव्हांच विसरून गेला होता.

"डोळ्यांनीं घेतलेली संथा तो हातांनीं गिरवूं लागला. रोज गांवांतलें एक एक बकरें त्याच्या तालमीसाठीं पुढें येऊं लागलें. आणि साथीदारांना रोजरोज सागुतीचें अन्न मिळूं लागलें. वस्तुतः त्यांच्या शिध्यासाठीं लागणारी कोणतीहि गोष्ट राजीखुषीनें आणि इतमामानें त्यांना मिळत असे. पण गांवचीं बकरीं जाऊं लागलीं तसे लोक अस्वस्थ होऊं लागले. पण गोंदबाविरुद्ध आवाज उचलण्याची कोणाचीहि हिंमत नव्हती. गांवच्या म्हाताऱ्याकडे अशी कांहीं कुरकुर केली तर ते म्हणत, 'बोलून-चालून त्यांनीं शिपाई पेशा पत्करला आहे. तेव्हां त्यांनीं पाला खाऊन जगावं आणि तलवार मारावी असं म्हणण्यांत काय अर्थ? गाई सांभाळायाच्या असल्या तर बकरीं दिलीं पाहिजेत!" अर्थात् लोकांनींहि समजुतदारपणानें सदरेवर कागाळी नेली नाहीं.

"शेवटीं एकदांचा गोंदबाला काट साधला. पण बकऱ्यांचें मरण कांहीं टळलें नाहीं. कारण त्याच्या साथीदारांना आतां सागुतीची चट लागली होती आणि सगळ्यांनाच कमी-अधिक प्रमाणांत रक्ताची दीक्षा मिळाली होती. नारळाला तर ते लोक केव्हांच विसरून गेले होते. दिवसां शेतांवर खपून रात्रीं पाहाऱ्यावर जाणारे जे लोक होते त्यांना गांवांत काय चाललें आहे याची जाणीव होती. ते आणि जे बरेचसे विवाहित होते ते माणुसकी सांभाळून सगळें कांहीं करीत होते. पण जे सडे होते त्यांना कोणताच धरबंद नव्हता. गरज असो नसो—गांवचीं कोंबडीं, बकरीं, नारळ-शहाळीं, आंबे-फणस आणि भाजीपाला ते मालकीच्या तोऱ्यांत घेऊन येत. गोंदबाचा तळ रानांतच असे. इतक्या दिवसांत तो कधीं घरीं गेला नव्हता. त्यामुळें गांवांत काय चाललें आहे याची त्याला दाद नव्हती. आपल्या साथीदारांवर त्याची इतकी बहाल मर्जी झाली होती आणि त्याचबरोबर नारळाकडे इतकें दुर्लक्ष झालें होतें कीं एवढें हें वैभव असें सुखासुखी समोर येऊन कसें पडतें हा साधा प्रश्न विचारायचीहि बुद्धि त्याला होईना.

"धाडकऱ्यांचा पुरता बींमोड सरकारनें आतां केला आहे आणि धामधूम ओसरून स्थिरस्थावर झाली आहे अशी दवंडी गांवांत फिरविली गेली. त्याप्रमाणें खर्ची पडलेल्यांचा आणि तरवार गाजवलेल्यांचा सदरेवर बहुमान करण्यासाठीं सोनबांचें सगळ्यांना आमंत्रण गेलें. धाडकऱ्यांचा त्रास संपून आपल्याच लोकांचा गांवकऱ्यांना उपद्रव होत आहे याची कुणकुण आतां सोनबांना लागली होती. बाहेरचें अरिष्ट जाऊन घरांत अरिष्ट उभें राहिलें या जाणिवेनें ते बेचैन झाले होते. आणि केव्हां एकदां शस्त्राची जागा औतानें घेतली जाते अशी निकड त्यांना लागली होती.

"निमंत्रण गांवाला गेलें. तसेंच गोंदबाजवळहि येऊन पोंचलें. आपला आतां मोठाच गौरव होणार अशा सुखस्वप्नांत तो चूर होता. पण साथीदारांपैकीं एकानें जी बातमी आणली ती ऐकून गोंदबाचा रंग



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बिघडला. साथीदार म्हणाला होता : ‘ मानसन्माना-बरोबरच सदरेवर खोट्यानाट्याचा निवाडाहि होणार आहे. तशा कांहीं कागाळ्याहि गेल्या आहेत तिथ-पर्यंत ! ’

“ ‘ वा ! छान ! फार सज्जन आहेत लोक आपले. आम्ही जान देऊन गांव बचावला त्याची किंमत अशी करताहेत काय हे लोक ? तर मग हा नारळ सदरेवर घेऊन जा आणि सोनबाकाकांना सांग—इथला न्याय इथें होऊन गेला आहे. तो तिथें चालणार असेल तर आमचा इथूनच नमस्कार. ’

“ सोनबांकडून निरोप आला : ‘ सदरेहून मोठें न्यायासन नाहीं. गांवापेक्षां माणसाची मातब्बरी अधिक नाहीं. त्याला शरण जाण्यांत कमीपणा नाहीं, बहुमान आहे. तुझा पराक्रम ही गांवची शोभा आहे तिला उद्धटपणाचें काजळ लावणें आपल्याला शोभत नाहीं. शत्रूला तोंड देण्यापेक्षां न्यायाला मान तुक-वण्यांत अधिक शौर्य आहे. येत्या सोमवारीं सदर भरणार आहे. ’

“ सोनबांच्या फर्मानाप्रमाणें दळांतले सगळे लोक सदरेवर गोळा झाले. पण गोंदबा आणि त्याचे चार-आठ जिवलग साथीदार शेवटपर्यंत आले नाहींत. सोनबाला मोठें वाईट वाटलें. सगळा गांव त्याच्यावरून मीठमोहऱ्या ओंवाळायला आणि दिवे दाखवायला तयार होता. आजच्या आनंदाच्या प्रसंगीं फौजेकरवीं झालेले लहानसहान उपद्रव लोक केव्हांच विसरून गेले होते. पण गोंदबानें सदरेची अवज्ञा करावी हा बाण सगळ्यांनाच झोंबला. त्यांतल्या त्यांत सोनबांना जास्तच.

“ ते त्याला पोटाशीं धरायला त्याच्या पाठीवर शाबासकीची थाप द्यायला, त्याच्या हातानें कुल-देवाच्या पूजेचा उत्सव करायला किती उत्सुक होते ! गोंदबा न आल्यामुळें सगळ्या सोहळ्यावर विरजण पडलें होतें. तरीहि रीतसर सगळ्या गोष्टी झाल्या. पण त्यांत जीव नव्हता. कळसूत्री चित्रा-प्रमाचें सोनबांचें शरीर समारंभांतून वावरत होतें. पण त्यांचें हृदय तिथें रानांत गोंदबाला ओढून आणण्यासाठीं रक्तबंबाळ होऊन हिंडत होतें. आणि गोंदबाहि सोनबांची आठवण करीत आंतल्या आंत आंसवें गिळीत अंथरुणावर कण्हत पडला होता.

“ निवाडा करण्याची वेळ आली त्या वेळीं सोनबा म्हणाले : ‘ ज्यानें या सगळ्या लोकांची मुख-त्यारी केली त्याच्याच शिरावर सगळ्या पापपुण्याची जबाबदारी आहे. गांवावरचें संकट गोंदबानें निभा-वून नेलें याबद्दल आम्ही सगळेच त्याचे ऋणी आहोंत. आम्हां सर्व लहानथोरांचा त्याला आज मुजरा आहे. त्याच्या आणि आमच्या कमनशिबानें आज तो येथें नाहीं. पण सदरेची अवज्ञा करून आपल्या पराक्रमाचा त्यानें पाणउतारा केला आहे. त्यानें नारळाबरोबर शस्त्र पाठविलें नाहीं. लोकांना तारक झालेलें शस्त्र त्याला मारक न होवो. त्याच्या-वर न उलटो अशी कुलदेवाची आपण करुणा भाकूं. सगळ्यांच्या अपराधाची जबाबदारी गोंदबा-वर असल्यामुळें आणि तोंच इथें हजर नसल्यामुळें इतर सगळे सुटले आहेत आणि हा निवाडा कुल-देवाकडे सुपूर्द केला आहे. ’ इतकें बोलून सोनबांनीं गोंदबाकडून आलेला नारळ देव्हाऱ्यांत ठेवला आणि सगळ्या लोकांना नैवेद्याचा पायस वाढून आणि त्यांना बक्षिसी देऊन त्यांची बोळवण केली.

“ गोंदबा आज येईल, उद्यां येईल अशी घरांत आणि गांवांत बहुतेकांची अपेक्षा होती. पण हळू-हळूं ती मावळत जाऊं लागली. सगळ्यांनाच या गोष्टीचा विषाद वाटत होता. वृद्ध सोनबा तर बाहेर अंगणांतल्या सोप्यावर उत्तररात्रपर्यंत आतांशा जागत बसलेले असत. गोंदबा घरीं येत नाहीं ही त्यांच्या जीवाची मोठीच व्यथा आहे हें जो तो मनांत उमजून होता. म्हणून त्यांच्याशीं तो विषय काढायला कोणी धजत नसे. एखाद्या समवयस्कानें तसा तो काढण्याचें साहस केलेंच तर ते म्हणत— ‘ तो यायचा नाहीं. जळला तरी पीळ सोडायला नाहीं. अभिमानांत मिसळलेला कैफ मोठा दुर्धर असतो. कधीं तो वर होतो कधीं तो शाप होतो. पण आमच्या घराण्याला तो मिळाला आहे खरा ! ’ इतकें बोलून त्यांनीं दीर्घ सुस्कारा सोडला म्हणजे गोंदबाच्या येण्याची उरलीसुरली आशाहि त्याच्या धगीनें करपून जाई.

“ असे आणखी कांहीं दिवस गेले. रोज नव-नव्या कागाळ्या सोनबांच्या कानांवर येऊं लागल्या. गोंदबा आणि त्यांचे साथीदार यांनीं आपली गांवांतली



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पत सदरेचें आमंत्रण झिडकारल्यामुळें घालवली होती, आणि चारचौघांत जायला त्यांना तोंड उरलें नव्हतें. त्यांच्या जीवनाचा जुना खाक्या चालू होता. पुढें याच आमच्या कुळागरांत त्यांनीं आपलें वास्तव्य केलें. इथला खंड घेऊन ते आपला चरितार्थ चालवूं लागले. सोनबांना हें कळलें. पण त्यांनीं त्याबद्दल गोंदबाला बोल लावला नाहीं. 'त्याच्या पराक्रमाला असलीं सात ठिकाणें तोडून दिलीं तरी थोडीं. मला दुःख होतं तें तो घरीं येत नाहीं याचं.' ते म्हणत. तरीहि कागाळ्या चालूच राहिल्या. आज कुणाचीं केळफुलं कापून नेलीं. उद्यां कुणाचीं कोंबडी-बकरीं उचललीं, परवां कुणाला वेठीला धरून काम करून घेतलं—अशा एक ना दोन असंख्य गोष्टी. वृक्षाला कीड लागावी तसे सोनबा आंतल्या आंत पोखरले जाऊं लागले. पुढें पुढें तर गोंदबानें बाई ठेवल्याचेंहि त्यांच्या कानांवर गेलें. तरीहि ते म्हणाले: 'आपल्याच कर्मानं मानाच्या खोट्या कल्पनेनं त्यानं हा वनवास ओढवून घेतला. गांवांतली पत बुडवली. मग कुळवंताची लेक सांगून कशी येणार? विहिरीच्या पाण्याला मुकल्यावर फोंडाऱ्याचं (डबक्याचं) पाणी तोंडाला आल्याशिवाय कसं राहील!'

"त्यानंतर पूर्वींपेक्षांहि भयंकर बातम्या कानांवर येऊं लागल्या. घडलेले प्रकार उभ्या गांवाचा तिळपापड उडवणारे होते. पण सोनबापर्यंत पोंचतांना ते सौम्य होऊन पोंचले होते. पण त्या सौम्यतेमागची दाहकता ओळखण्याची नजर त्यांच्यांत होती. लांकडें तोडायला रानांत गेलेल्या गांवकऱ्यांच्या तरण्याताठ्या मुलींवर गोंदबाच्या लोकांकडून हात टाकला गेला होता. त्यांचें शील धोक्यांत आलें होतें. तापलेल्या सळया कानांतून आरपार जाव्या तसें सोनबांना झालें. आपल्या नेकीची धार मायेमुळें बोथट झाली अशा समजानें त्यांच्या अन्तःकरणानें पेट घेतला. गांवाचें स्वास्थ्य, घराण्याची प्रतिष्ठा, गोंदबाचें जीवित, त्याला पुन्हां माणसांत आणण्याचे उपाय अशा असंख्य गोष्टी पेटते पलिते घेऊन त्यांच्या चित्तांत थैमान घालूं लागल्या. कागाळ्या घेऊन आलेल्या गांवकऱ्यांचीं तोंडें रात्रीच्या काळोखांत त्यांच्या चर्मचक्षूंना दिसत नव्हतीं. पण त्यांच्या अन्तःकरणांत पेटत असलेला अंगार त्यांच्या अंतश्चक्षूंना दिसत होता. विनयभंग झालेल्या मुलींच्या आसवांनीं तो कसा अधिकच पेटतो आहे हें त्यांना दिसत होतें. त्या मुलींच्या आणि त्यांच्या आयांच्या मूक वेदना त्यांचें काळीज कापीत होत्या. तो अग्नि, ते अश्रू, त्या वेदना एकाकार होऊन आपल्या सात माड्यांच्या वाड्याला घेरीत आहेत, जाळीत आहेत, भस्मीभूत करीत आहेत आणि तेंच भस्म कपाळाला लावून खवीसाप्रमाणें डोळे तारवटून आपण बसलों आहोंत आणि त्या भस्माच्या ढिगाऱ्यांतून कुलदेवाचा पांढरा घोडा टांचा उधळीत जात आहे, असें मूर्तिमंत चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर तरळूं लागलें. गांवकऱ्यांना उद्देशून ते म्हणाले, 'तुमचें गाऱ्हाणें मी कुलदेवाच्या कानांवर घालीन आणि उद्यां याच वेळीं त्याचा निवाडा तुम्हांला सांगेन. त्याच्यावर भरिभार ठेवा आणि झोंपीं जा.' बराच वेळपर्यंत ते तसेच सोप्यावर बसून होते. त्या काळोखांत ते कोणतीं चित्रें पहात होते आणि त्यांच्या मनांत कसला डोंब पेटत होता, देव जाणे!

"जेवणाची वेळ झाली होती. पंगत सोनबांची वाट पहात होती. पण त्यांना जेवायला बोलावण्याची कोणालाच हिंमत होईना. शेवटीं त्यांच्याशीं विशेष सलगी असलेल्या गोंदबाच्या वडिलांवर ही जोखीम सोंपवण्यांत आली. वस्तुतः ते सोनबांचे समवयस्क. दोघांचाहि एकमेकांवर फार जीव. पण सोनबांचा दरारा एवढा होता कीं, जास्तींत जास्त सलगींतले लोकदेखील दहा पावलांचें अंतर टेवून अदबीनें, उभ्यानें आणि खालच्या आवाजानें त्यांच्याशीं बोलत असत. आणि तेंहि मोजकेंच—अगदीं जरूरीपुरतें. गोंदबा हा सोनबांच्या व्यथेचा विषय झाल्यापासून तर या दोन स्नेह्यांत जास्तच अबोलपणा आला होता. जो तो आपापल्यापरी आंतल्या आंत तळमळत होता. पण दोघांचींहि तोंडें बांधल्यासारखीं झालीं होतीं. आणि रानांत घडलेले प्रकार आधींच कानांवर येऊन पोंचल्यामुळें गोंदबाच्या वडिलांवर आज गुन्हेगाराप्रमाणें त्यांच्यासमोर उभें राहण्याचा प्रसंग आला होता. किती तरी वेळ भिंतीच्या जवळ ते उभे होते. पण मनांत नाना वाक्यें रचूनहि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बिचाऱ्या म्हाताऱ्याच्या तोंडून शब्दहि फुटत नव्हता. असा बराच वेळ गेला. काळोखाला भेदून पाहाण्याची नजर सोनबांच्या ठिकाणीं आहे याविषयीं त्यांची खात्री होती. त्यामुळें त्यांच्या मौनानें ते जास्तच गडबडले आणि आपला तोल जाऊं नये म्हणून त्यांनीं भिंतीचा आधार घेतला.

" सोनबांनींहि हें ओळखलें असावें. शंखांतून आवाज उमटावा तसे काळोखांतून शब्द आले, ' सगळं कांहीं कळलं आहे ना तुला ? '

" ' हो ' आंवढा गिळीत गोंदबाच्या वडिलांनीं हुंकार दिला.

" ' मग तुला मुलगा पाहिजे कीं घर पाहिजे ? '

" गोंदबाचे वडील क्षण दोनक्षण घुटमळले आणि म्हणाले, ' घरासाठींच तर मुलगा मागतात ना ? ' आणि धोतराच्या सोग्यानें त्यांनीं कपाळाचा घाम पुसून घेतला.

" ' तशी व्यवस्था करतों तर मग. जा जेऊन घ्या म्हणावं सर्वांना. मला आज जेवायचें नाहीं. रातीचं जेवण सोडलं आहे मीं आतां. काळीज–डोक्यांच्या लढाईत पोट नको आणखी आड यायला.'

" गोंदबाचे वडील जाऊन पानावर बसले. तेहि जेवायला बसले नसते तर सगळीच पंगत उपाशी राहिली असती. म्हणून मनांतला क्षोभ बाहेर मुळींच न दिसूं देतां किंवा डोळ्यांत पाणीहि न जमूं देतां आसवांत भात कालवून ते घशांवाटे घालूं लागले.

" दुसरे दिवशीं त्याच वेळीं आणि त्याहूनहि जास्त काळोखांत यमदूतासारखे ते लोक अंगणांत येऊन उभे राहिले. सोनबा म्हणाले:

" ' देवाचा न्याय माणसांचा मुलाहिजा आळखत नाहीं. घराची रीत सोडलेला माणूस घरचा राहत नाहीं. अर्थात् तो आमच्या घरचा नाहीं असें समजून काय करायचें तें करा. ' लोक परसांतल्या वृक्षाप्रमाणें निश्चल उभे होते. त्यांनादेखील हा निवाडा निर्दय वाटला असावा. सोनबांचा निकाल फिरेल अशा आशेनें ते थांबले असावे.

" ' जा. जा म्हणतों ना ? ' कोयता हाणल्याप्रमाणें करड्या आवाजांत त्यांना खडसावीत ते म्हणाले.

" त्यानंतर काय झालें हें कांहीं कळलें नाहीं. पण गांवचा उपद्रव कायमचा बंद झाला. बायाबापड्या निर्धास्तपणानें आणि उजळ मुखानें रानांतून देखील वावरूं लागल्या. लोक कुजबुजत कीं गोंदबाची हत्या झाली आणि त्याचे साथीदार एक मारले तरी गेले असावेत किंवा देशांतराला तरी गेले असावेत.

" पण सोनबांनीं सुतक काहीं पाळलें नाहीं. त्यामुळें तो मेला किंवा त्याची हत्या झाली असें बोलायलाहि गांवांत कोणी धजलें नाहीं. मात्र त्याच्या वस्तीचें हें ठिकाण त्यांनीं देवाचें नांवानें सोडलें. गांवावर किंवा आमच्या घराण्यावर एखादें अरिष्ट आलें आणि त्या वेळीं कुलदेवाला कौल लावला तर पुजारी समंधाची बाधा सांगतो आणि अजूनहि आम्ही गोंदबाच्या नांवानें देवचाराला बकरीं कोंबडीं पाठवितों आणि देवीला खणा-नारळाची ओटी धाडतों. या निरंकालमधून आम्ही कांहीं धेत नाहीं तरीदेखील जर त्याचा इतका उपद्रव होतो आहे तर इथले कांहीं खाल्लें–प्यालों तर आमच्या मानगुटीला बसून आपल्याप्रमाणें आम्हांलाहि अनाचाराला लावायचा ! "

इतका वेळ बाबांची गोष्ट मी चित्रवत् होऊन ऐकत होतों. अगदीं सुरुवातीपासून भुताची माया पडावी तसा मी पछाडल्यागत झालों होतों. इच्छा असूनहि माझ्या तोंडून प्रश्न किंवा उद्गारचिह्नहि उमटलें नव्हतें. मात्र आतां मी म्हणालों :

' गोंदबाच्या आठवणीमुळेंच, कैफापासून सावध राहण्याचा इशारा तुम्हीं दिला होता वाटतं मला.'

' हं. ' ते जणूं स्वतःशींच म्हणाले.

झाडावरचे जांब अजून मला दिसत होते. पण मला आतां ते लांकडी फळांसारखे वाटले. आणि मी वडलांना म्हणालों, ' चला आपण जाऊं पुढं.'

जड पावलांनीं आम्ही पुढची वाट चालूं लागलों.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. य. र. आगाशे

# शिक्षणाच्या पुनर्घटनेची दिशा

आपल्या देशांत राजकीय स्वातंत्र्याचा उदय झाला त्याचें आनंदानें स्वागत केल्यानंतर तें स्वातंत्र्य टिकविणें व त्याचा यथोचित उपयोग करण्याची पात्रता अंगीं आणणें याविषयीं मनांत विचार-परंपरा सुरू होते. राजकीय स्वातंत्र्य मिळालें म्हणजे त्याबरोबर समाजाची सर्वांगीण सुधारणाहि आपो-आप सिद्ध झाली असें कोणी समजणार नाहीं. अनेक-विध सामाजिक कार्य सर्व कांहीं अजून व्हावयाचें आहे. ही समाजकार्यांची चढण आज स्वातंत्र्याच्या प्रकाशांत आपणाला अधिकच स्पष्ट दिसत आहे. अशा परिस्थितींत शिक्षणाचा गाडा केवळ पूर्व-पद्धतीनें चालू ठेवण्यापेक्षां शिक्षण प्रभावी होण्या-साठीं त्याची पुनर्घटना कशी करावी हा विचार करण्याची आलेली अपूर्व संधि आपण व्यर्थ घालवूं नये. प्राथमिक, दुय्यम, उच्च इत्यादि सर्व प्रकारच्या शिक्षणाची व शिक्षणपद्धतीची पुनर्घटना आज आवश्यक आहे.

## मानसिक व सामाजिक संस्कारांचें महत्त्व

शिक्षण कोणत्याहि प्रकारचें असो; मनुष्य-व्यवहारविषयक शास्त्राचें असो किंवा भौतिक शास्त्राचें असो, हस्तकलांचें असो वा यंत्रकलांचें असो एखाद्या ज्ञानविज्ञानाच्या शाखेंत कांहीं गति प्राप्त होणें किंवा यंत्रकलेमध्यें, हस्तकलेमध्यें कृति-कौशल्य दाखवितां येणें एवढ्यानें शिक्षणाचें समग्र कार्य होईलच असें नाहीं. विवक्षित ज्ञानप्राप्तीपेक्षां तें ज्ञान मिळवीत असतां होणारे शारीरिक व मानसिक संस्कार–कार्यतत्परता, सौजन्य, सहकार्य, विवेक, संयम इ० सामाजिक सद्‌गुण यांस खरें महत्त्व आहे. एखादी व्यक्ति किंवा समाज यंत्रविद्येमध्यें मोठें नैपुण्य संपादन करील; परंतु त्या लोकोत्तर विज्ञा-नाचा उपयोग आत्मोन्नति आणि सामाजिक प्रगति यांकरतां नेहमींच होतो असें नाहीं. तेव्हां आत्मनाश होऊं नये ही ध्येयदृष्टि शिक्षणांत नेहमीं स्फुरत असली पाहिजे. बुद्धीबरोबर सद्‌भावनेचा विकास कटाक्षानें साधला पाहिजे. याकरितां अगदीं लहानपणीं नाहीं तरी १०–११ वर्षांचें वय झाल्यापासून सामाजिक आणि सामुदायिक कर्तव्याची जाणीव विद्यार्थ्यांला प्रसंगा-प्रसंगानें देत राहिलें पाहिजे.

## शिक्षकांची पात्रता

अशा रीतीनें शारीरिक आणि मानसिक शक्तीचा विकास घडवून आणणारा शिक्षकहि विद्वान् आणि चारित्र्यसंपन्न पाहिजे. शिक्षण लहान मुलांचें असलें तरी शिक्षकाचें ज्ञान आणि चारित्र्य लहान असून चालणार नाहीं. मनुष्यांच्या शारीरिक व मानसिक व्यवहाराचीं शास्त्रें त्याला कांहीं मर्यादेपर्यंत अवगत असावीं. प्राथमिक शिक्षकाला स्वभाषेच्या द्वारें उच्च शिक्षणाचा लाभ आवश्यक आहे. तेव्हांच त्याला शिक्षणाच्या ध्येयदृष्टीचें आणि शिक्षण-विषयक सामाजिक मूल्यांचें आकलन होईल व तो विद्यार्थ्यांच्या शारीरिक व मानसिक हाल-चालींना योग्य वळण देईल. प्राथमिक शिक्षण सक्तीचें आणि सार्वत्रिक करतांना शिक्षकाला पुरेसें उच्च शिक्षण मिळण्याची सोय प्रथम झाली पाहिजे. होतकरू शिक्षकाचें प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर मातृभाषेच्या द्वारें दोन-तीन वर्षें विविध ज्ञान-विषयांचें शिक्षण त्याला विश्वविद्यालयामध्यें मिळालें



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहिजे. त्याकरितां मातृभाषेच्या द्वारां उच्च शिक्षण देणारी स्वतंत्र विद्यालयें (Second Grade Colleges) आवश्यक आहेत. विद्यमान ट्रेनिंग कॉलेजांत शिक्षणतंत्र शिकविण्याचेंच धोरण प्रामुख्यानें असल्यामुळें तेथें विविध ज्ञानशाखांचें उच्च शिक्षण मोठ्या प्रमाणावर देणें शक्य होत नाहीं. पुरेसें उच्च शिक्षण मिळाल्यानंतर स्वतंत्रपणें एक वर्ष शिक्षणशास्त्र आणि कला यांचा अभ्यास शिक्षकाचे ठिकाणीं योग्य ती पात्रता उत्पन्न करील. शिक्षण प्रभावी व्हावयाचें तर शिक्षकाचा अधिकार व प्रतिष्ठा वाढविली पाहिजे. दुय्यम व उच्च शिक्षणाच्या श्रेणींतहि शिक्षकाची ज्ञानोपासना अशीच उच्च दर्जाची पाहिजे. या कामीं खर्चाची अडचण भासेल, परंतु केवळ शिक्षणाचा विस्तार किंवा शिक्षितांची संख्यावृद्धि अपेक्षित मूल्यें निर्माण करूं शकत नाहीं. आजपर्यंतच्या शिक्षणावरून ही गोष्ट स्पष्ट झाली आहे. शिक्षणाच्या आत्मगुणाकडेच लक्ष देणें आवश्यक आहे. शिक्षकाचे बाबतींत समाजानें आणखी एक गोष्ट मान्य केली पाहिजे ती ही कीं शिक्षकाचें मानसिक उद्बोधनाचें कार्य वकील, डॉक्टर, एंजिनीअर इत्यादि पेशांतील कार्यापेक्षां कमी योग्यतेचें नाहीं. तें कमी मानल्यास व निकृष्टपणें होऊं दिल्यास त्याचा दुष्परिणाम सामाजिक जीवनावर झाल्यावांचून राहणार नाहीं. त्या दृष्टीनें शिक्षकाला आपलें व आपल्या लहानशा कुटुंबाचें पोषण करतां येईल इतकें वेतन त्याला मिळालें पाहिजे. त्याकरितां त्याला कर्ज काढण्याचा प्रसंग येऊं नये. समाजानें इतकी कर्तव्यदृष्टि तत्परतेनें दाखवावी आणि शिक्षकानें ज्ञान व चरित्र्य यांची उपासना अखंड चालू ठेवावी. या गोष्टीवर शिक्षणाचें अपेक्षित फल केव्हांहि अवलंबून राहील.

### ग्रामीण जनतेचें शिक्षण

प्राथमिक शिक्षणाचा विचार मुख्यतः ग्रामीण जनतेच्या दृष्टीनें केला पाहिजे. शहरांतील परिस्थिति निराळी असते व तेथें सुधारणेचें पाऊल लवकर पडूं शकतें. परंतु एकंदर देशाच्या शिक्षणाचा विचार कर्तव्य असतां खेडेगांवांतील जनतेचें प्रमाण जसें मोठें तसें त्यांचें शिक्षणहि सर्वाधिक महत्त्वाचें. त्यांची कार्यक्षमता ती सर्व देशाची. या कामीं वर्धा-शिक्षण-योजनेचा मोठा उपयोग होणार आहे. ती प्रभावी होण्याचें कारण तिच्यांत पुस्तकांवर भर दिला नसून प्रत्यक्ष कृति आणि मूलोद्योग यांस महत्त्व आहे. ती जीवनशिक्षणाची योजना आहे. ७ ते १४ वर्षांच्या अवधीमध्यें खेड्यांतील मुलें ग्रामीण समाजाचे कार्यक्षम घटक या दृष्टीनें तयार व्हावीं हें तिचें उद्दिष्ट आहे. शिक्षण पुस्तकी न होतां पदोपदीं भोंवतालच्या सामाजिक जीवनाशीं तें एकरूप असावें व स्वावलंबनाकडे दृष्टि निश्चल राहावी हा गुण त्यांत साक्षेपानें साधावयाचा आहे. त्या त्या देशविभागामध्यें लोकजीवनाला आधारभूत असे जे ग्रामोद्योग किंवा निर्वाहाचे व्यवसाय चालू असतील ते –शेतकी, बागाईत, सुतारकाम (अनेक प्रकारचें लांकूडकाम), लोहारकाम (अनेक प्रकारचें धातूंचें काम), अनेक प्रकारचें शिल्पकाम, कच्चा माल सुलभतेनें मिळत असल्यास त्या मानानें कापूस, लोंकर, रेशीम यांचें विणकाम यांसारखा कोणताहि जीवनोपयोगी हस्त-व्यवसाय (Basic craft)–हें त्या शिक्षणाचें केंद्र समजलें जातें. अशा व्यवसायाची आरंभापासून संवय होत गेल्यामुळें त्याचें पर्यवसान कोणत्या तरी उत्पादक श्रमामध्यें साहजिकपणें व्हावें. केवळ तोंडी किंवा पुस्तकी माहितीच्या द्वारें शारीरिक, मानसिक, नैतिक गुणाचा विकास होऊं शकत नाहीं; परंतु मुलांच्या कृतिप्रधान अभ्यासक्रमांत त्याची दखलगिरी अधिक घेतां येते. बुद्धीचा विकास घडवून आणण्याचें कृति हें अमोघ साधन आहे (thinking hand). शब्द-ज्ञानापेक्षां कृति शतपट फलदायी होते. कृति-प्रधान व्यवसायामध्यें शरीरबल, बुद्धिचापल्य, सहकार्य, बंधुत्व, समाज, देश, मानवता, यांविषयीं झटण्याची भावना अधिक समर्थपणें उत्पन्न होईल.

वर्धाशिक्षणयोजनेमध्यें दुसऱ्या एका तत्त्वावर भर दिला आहे. तें म्हणजे Principle of correlation. वय ७ ते १४ वर्षेपर्यंतच्या शिक्षणांत ज्या मूलोद्योगा (Basic craft)-ला मध्यवर्ती स्थान द्यावयाचें त्याच्याशीं साक्षात् संबद्ध असेंच ज्ञान–इतर आनुषंगिक विषयांची माहिती मुलांस द्यावयाची. भाषा, गणित, इतिहास, भूगोल, शास्त्र इत्यादि विषय हल्लींप्रमाणें पृथक्पणें शिकवावयाचे








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाहींत. मूलोद्योगाचा दैनंदिन व्यवसाय चालू असतां त्याच्या अनुषंगानें व त्याचा सर्वांगीण व्यवहार सुस्पष्ट होईल अशा रीतीनें आवश्यक माहिती द्यावयाची. सुसंबद्ध आणि संवादी गोष्टी ध्यानांत नीटपणें राहतात. या दृष्टीनें वरील तत्त्व उपयुक्त आहे. विणकामासारखा मूलोद्योग घेतला तर कापसाचीं झाडें कशीं असतात, त्यांस कोणत्या प्रकारची जमीन व हवामान लागतें, कोणत्या प्रांतांत व कोणत्या प्रदेशांत कापसाचें पीक येतें, कापसाचीं बोंडें गोळा करणें, कापसांतून सरकी काढणें, गठ्ठे बांधणें, सूत काढणें, वस्त्रें विणणें हे व्यवसाय लहान-मोठ्या प्रमाणावर कोठें व कां होतात, त्या बाबतींत आपला देश स्वावलंबी आहे कीं नाहीं, टकळी, चरखा, हातमाग, यंत्रशक्तीनें चालणारे माग, गिरण्या, मजूर, मजुरांचें जीवन, भांडवल आणि भांडवलवाले इत्यादिकांविषयीं प्रसंगाप्रसंगानें विद्यार्थ्याला माहिती देऊन विणकाम शिकणारा विद्यार्थी जाणतेपणानें विणकाम करणारा व्हावा. आपल्या सुतार–लोहार–कोष्ट्यांप्रमाणें आपल्या उद्योगाची एकच बाजू जाणणारा व इतर आनुषंगिक गोष्टींचें ज्याला ज्ञान नाहीं असा अगतिक आणि अल्पज्ञ असूं नये. त्याला आपल्या उद्योगाचे धागेदोरे कोठें दूरवर पसरले आहेत त्यांचें ज्ञान पाहिजे.

## जीवन हेंच शिक्षणाचें केंद्र

ग्रामीण शिक्षणाची वरील भूमिका तर्क व मानसशास्त्र या दोहोंसहि धरून आहे. परंतु प्रत्यक्ष व्यवहारामध्यें या भूमिकेवरून सर्व गोष्टी करणें हें तितकेंच कठिण आहे. अत्यंत कुशल व शास्त्रकलापारंगत असा शिक्षकच या पद्धतीनें कार्य करूं शकेल. सध्यांच्या प्राथमिक शिक्षकाजवळ असलेलें ज्ञान पुरें पडणार नाहीं. याचकरतां त्याला मातृभाषेच्या द्वारें दोन-तीन वर्षें उच्च शिक्षण मिळावें ही गोष्ट पूर्वीं निदर्शनास आणली आहे. कांहीं अधिक व्यावहारिक अडचणी वर्धाशिक्षणयोजनेच्या बाबतींत उत्पन्न होतील. मूलोद्योग आणि संबद्धज्ञान (Basic craft and correlated Knowledge) यांचा विनियोग तारतम्यानें झाला पाहिजे. जीवनशिक्षणाच्या दृष्टीनें शाळेंतील शिक्षण व्हावें हें महत्त्वाचें आहे. त्याकरितां कोणत्या तरी मूलोद्योगाचें शिक्षण, त्याला २–३ तास मिळावे, त्या उद्योगाचीं अंगें-उपांगें, त्याचा ग्रामीण जीवनाशीं संबंध स्पष्ट व्हावा या गोष्टी इष्ट आहेत. तथापि, शिक्षणाच्या प्रत्यक्ष कार्यक्रमांत जीवनाचे दृष्टीनें आवश्यक वाटणाऱ्या सर्वच शिक्षणाची उभारणी हस्तकलेच्या द्वारा करणें कठिण आहे; त्याच प्रमाणें संबद्ध ज्ञानाचें तत्त्वहि सर्व ठिकाणीं लावणें सोपें नाहीं. शिक्षकानें आपला प्रत्येक पाठ हस्तकलेशीं संबद्ध होईल अशा रीतीनें द्यावयाचा हें ठीक; परंतु स्वाभाविक आणि सयुक्तिक संबंध एखदा स्थूल मानानें दाखवितां येईल. तो प्रत्येक दिवशीं प्रत्येक पाठांत दाखवितांना पुष्कळ वेळां तो केवळ बादरायण संबंधच होईल व हास्यास्पद वाटेल. त्यापेक्षां सभोंवतालच्या व एकंदर देशाच्या जीवनाकडे लक्ष केंद्रित करून विद्यार्थ्यांच्या जीवनशिक्षणाची योजना आंखावी. शारीरिक, मानसिक दृष्टीनें समाज व देश यांच्या अपेक्षेनें स्वावलंबी जीवन त्याला जगतां येईल, तो समाजाचा कार्यक्षम घटक होईल अशा प्रकारें विद्यार्थ्यांस शिक्षण मिळावें. अन्न, वस्त्र, निवास इत्यादि समाजाच्या प्राथमिक गरजांवर आधारलेल्या मूलोद्योगाची व्याप्ति जीवनाइतकी आहे हें तत्त्वतः खरें असलें तरी शिक्षणाच्या व्यवहारांत Basic craft ही एकच सर्वव्यापी होऊं शकणार नाहीं व जीवनाचे दृष्टीनें आवश्यक अशा इतर पुष्कळ गोष्टी, त्यांचा प्रत्यक्ष संबंध मूलोद्योगाशीं येऊं शकत नाहीं, म्हणून राहून जातील. तेव्हां मूलोद्योग व तत्संबद्ध विविध ज्ञान यांसच महत्त्वाचें स्थान असलें तरी शिक्षणाचें केंद्र जीवन हें असावें. म्हणजे त्या त्या देशविभागाचे सामाजिक आर्थिक जीवन तेथील परिस्थिति, त्या ठिकाणचें हवामान, डोंगर-नद्या वृक्ष-वनस्पति, पिकें, फळफळावळ, प्राणी, निसर्गतः उदयास आलेले ग्रामोद्योग, लोकांचे सामाजिक धार्मिक आचार, ग्रामीण शासनपद्धति व एकंदर जीवनाची सरणी यांचा परिचय विद्यार्थ्यांस करून देणें सुलभ होईल. या गोष्टींचा जीवनाशीं संबंध उघड असल्यामुळें तो ओढूनताणून प्रस्थापित करण्याची अडचण शिक्षकास पदोपदीं भासणार








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाहीं. केवळ मूलोद्योग हेंच केंद्र समजल्यास तशी अडचण प्रत्यक्ष शिक्षणाच्या व्यवहारांत पदोपदीं येईल. जीवन हें शिक्षणाचें केंद्र समजल्यास जें ज्ञान मूलोद्योगाशीं साक्षात् जोडतां येणार नाहीं, परंतु जीवनाच्या दृष्टीनें आवश्यक वाटेल तें विद्यार्थ्यांचा जीवनविषयक दृष्टिविकास होण्याकरितां देण्यास अडचण वाटणार नाहीं. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां वय ७ ते १४ पर्यंत शिक्षण देणाऱ्या प्राथमिक शाळा म्हणजे जीवनशिक्षण देणारी Activity school असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## विद्यार्थ्यांना त्यांच्या प्रवृत्तीप्रमाणें मार्गदर्शन

शिक्षणाच्या प्राथमिक कालांत मूलोद्योग, हस्तकला यांवर भर देणें जसें आवश्यक आहे त्याप्रमाणें दुय्यम शिक्षणाच्या कार्यक्रमांत सुमारें दोन तास प्रत्येक दिवशीं कोणत्या तरी हस्तकलेच्या अगर यंत्रकलेच्या व्यवसायांत विद्यार्थ्यांनें घालविले पाहिजेत. हें शिक्षण कोणत्या प्रकारचें ही गोष्ट त्या त्या ठिकाणच्या औद्योगिक परिस्थितीवर अवलंबून राहील. अगदीं आरंभीं मुलांच्या श्रमानें होणारी वस्तुनिर्मिति साक्षात् अर्थोत्पादक होणार नाहीं. तथापि, थोडें कौशल्य अंगीं येतांच आपल्या कलेचें जीवनोपयोगित्व शिकणाराच्या मनावर ठसेल. खेडेगांवांतील परिस्थितीच्या मानानें, प्राथमिक शाळेंतील शिक्षण संपण्याचे वेळीं—सुमारें १४ व्या वर्षीं—अशी जीवनोद्योगाची कार्यक्षमता विद्यार्थ्यांचे ठिकाणीं उत्पन्न झाली पाहिजे. याच मर्यादेला अनुसरून दुय्यम शिक्षणामध्यें पांचव्या इयत्तेच्या शेवटीं कोणत्यातरी कलेविषयीं, हस्तोद्योगाविषयीं किंवा यंत्रकलेविषयीं अनुकूल प्रवृत्ति ( bias ) विद्यार्थ्यामध्यें दिसून यावी व त्या प्रवृत्तीची दखलगिरी शिक्षणांत काळजीपूर्वक घेतली जाऊन विद्यार्थ्यांच्या पुढील शिक्षणाचें मार्गदर्शन व्हावें. लांकूडकाम, होजिअरी, विणकाम, खेळणीं तयार करणें, बुकबाइंडिंग, साइनबोर्ड पेंटिंग, साबू बनविणें, रंगकाम, कपडे शिवणें, शिंपीकाम, अनेक प्रकारचें यंत्रकाम वगैरे विविध व्यवसाय समाजामध्यें चालू असतात व आधिक उत्पादक उद्योगांची जरूरी असते. वीज, मोटर, फिल्म, रेडिओ, एंजिनिअरिंग, आरोग्य वगैरे अनेक गोष्टींना आज जीवनांत प्रामुख्य आलेलें आहे. याविषयीं प्रथम-प्रवेश विद्यार्थ्यांचे बाबतींत अपेक्षित आहे. शिक्षण-तज्ज्ञ आणि उद्योग-उपयुक्त कला, यंत्रकला यांतील विशारद हे, सहकार्यानें त्या त्या परिस्थितीला अनुसरून पांच इयत्तांपर्यंतचा कृतिप्रधान शिक्षणक्रम निश्चित करूं शकतील. विद्यार्थ्याला प्रत्यक्ष शाळेंत जाऊन यापुढें शिक्षण घेणें अशक्य असल्यास आतांपर्यंतच्या प्राथमिक उद्योगपरिचयाचे बळावर तो थोडेंबहुत स्वावलंबन करील व आपल्या उद्योगांतहि अधिक प्रावीण्य पैदा करील. परंतु एकच धोपट मार्गानें जाऊन केवळ वाङ्मयप्रधान किंवा बुद्धिप्रधान शिक्षणामुळें त्याची वाताहत होणार नाहीं, सामाजिक दृष्टीनें होणारा अपव्यय टळेल आणि उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत लायक व नालायक अशा विद्यार्थ्यांची गर्दी होऊन उच्च शिक्षणाचें स्वरूप हिणकस होणार नाहीं.

याप्रमाणें प्रायः १४–१५ वर्षांच्या शिक्षणामध्यें कोणत्या तरी मूलोद्योगाचा अगर तदनुषंगिक हस्तकला किंवा यंत्रकला यांचा अंतर्भाव व्हावा व पांचव्या इयत्तेच्या सुमारास विद्यार्थ्यांची साहजिक प्रवृत्ति ( bias ) कोणीकडे आहे याचें सप्रमाण निरीक्षण होऊन त्यांना निरनिराळ्या जीवनोद्योगाच्या मार्गानें पुढें पाठविण्यांत यावें. भिन्न भिन्न शाखांचा आश्रय विद्यार्थ्यांस करतां यावा. खेड्यांतील ग्रामोद्योग व शहरांतील यंत्रकला लक्षांत घेऊन पुढील शिक्षणाची व्यवस्था करतां येईल. शहरांमध्यें अशीं ( Industrial & Technical Schools ) विद्यालयें असतील त्यांचा उपयोग साहजिकच होईल.

## लोकसत्तेचें युग

येथवर प्राथमिक, दुय्यम व उच्च शिक्षणाविषयीं कांहीं विचारांचें निरूपण झालें. सक्तीचें सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण हें उद्दिष्ट साधावयास कांहीं कालावधि लागेल. आपणांला या लोकसत्तेच्या युगामध्यें एकंदर मतदारवर्ग समंजस व जाणता व्हावयास पाहिजे; कारण अजाणत्याचें बहुमत हें कवडीमोल होय. व त्यावर अधिष्ठित झालेली लोकसत्ता ही मानवी जीवन सुखी करूं शकणार नाहीं. या दृष्टीनें निरक्षर प्रौढांचें शिक्षण अत्यावश्यक होय. मतदारांमध्यें त्यांचाच भरणा मोठा. याकरितां



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साक्षरतेची मोहीम सुरू आहे. परंतु साक्षरतेइतकेंच सामान्य स्वरूपाचें ( not formal ) लोकशिक्षण किंवा प्रौढशिक्षण महत्त्वाचें आहे. साक्षरता निर्माण केली तरी ती टिकविणें फार कठिण आहे. चाळीस वर्षें वय झाल्यानंतर प्रथमच शिकलेलें वाचन-लेखन टिकाव धरूं शकत नाहीं. तेव्हां साक्षरता टिकविण्याच्या दृष्टीनें, किंबहुना केवळ जाणतेपणा उत्पन्न करण्यासाठीं सामान्य लोकशिक्षणाची योजना झाल्यास ती प्रभावी होईल. चित्रपट, रेडिओ, वर्तमानपत्रें, वाचनालयें, व्याख्यानें, सामाजिक सहकार्याचे प्रसंग, उत्सव, सण, इत्यादिकांच्या द्वारें प्रौढशिक्षणाची योजना करणें सर्वाधिक महत्त्वाचें आहे. प्रौढ स्त्री पुरुषांजवळ अनुभवाचें बळ असतें. शालेय शिक्षणाचा लाभ त्यांस मिळालेला नसतो. त्यांना आठवड्यांतून ३–४ वेळां जीवनशिक्षणांत आवश्यक अशी माहिती दिल्यास त्यांना तिचें आकलन होईल व त्यांचें ठिकाणीं समंजसपणाचा उदय होईल. खेड्यांतील लोकांची शेती व तिची सुधारणा, त्यांचे ग्रामोद्योग, त्यांचें साधें अर्थशास्त्र, सहकारी पद्धतीचे फायदे, स्थानिक स्वराज्य, ग्रामपंचायत, आरोग्य, रस्ते, दिवाबत्ती, पाणी, यांविषयीं व्यवस्था सामाजिक, धार्मिक चालीरीतीचा सोज्वलपणा व त्यांचा लहान-मोठ्या जनतेवर होणारा परिणाम, आर्थिक स्वावलंबन, औद्योगिक सहकार्य, बंधुता आणि ऐक्य इत्यादिकांचें सामाजिक महत्त्व यांविषयी यथोचित माहिती त्यांस मिळाल्यास समंजस मतदार व नागरिक या दृष्टीनें प्रौढ स्त्रीपुरुषांमध्यें जाणतेपणा उत्पन्न करतां येईल. नियमित श्रवणानें पुष्कळ कार्य होऊं शकतें. आपल्या आख्यानकवींनीं व कीर्तन–प्रवचनकारांनीं श्रवणद्वारांच धर्मनीतीचें शिक्षण आबालवृद्धांस दिलें आणि समाजाची धारणा केली. या कामीं त्या त्या ठिकाणच्या व इतरहि समाजकार्येच्छू सुशिक्षितांचें बळ एकत्रित केलें पाहिजे. ते सरकारी नोकर असोत वा नसोत. या मोठ्या कार्याकरितां सर्व ठिकाणीं अधिकाऱ्यांची श्रेणी उभी करतां येणार नाहीं. लोकशिक्षणाचें कार्य जाणत्या लोकांकडून, त्यांस योग्य तो गौरव दाखवून करून घेतलें पाहिजे, शक्यतर स्कूल लीव्हिंग व पदवीपरीक्षा देणाऱ्या विद्यार्थी तरुणांना या प्रकारच्या समाजसेवेची दीक्षा देऊन त्यांचेकडून वर्ष सहामहिने नियमित काम करून घेतलें पाहिजे. यामुळें त्यांच्या ज्ञानांत व अनुभवांत पुष्कळ भर पडेल. त्यांचा संबंध ग्रामीण जीवनाशीं, देशाच्या आर्थिक सामाजिक परिस्थितीशीं साक्षात् आल्यामुळें त्यांना राष्ट्रीय प्रश्न कोणते यांचें खरें ज्ञान होईल.

खेडेगांवांतील प्राथमिक शाळा ही ज्याप्रमाणें पद्धतशीर व नियमबद्ध शिक्षणाचें केंद्र त्याचप्रमाणें ती साक्षरता-प्रसार, प्रौढशिक्षण, इतर सामाजिक व धार्मिक सहकार्याचें केंद्र व्हावी. सोयीकरतां सामाजिक सहकाराचें केंद्र अन्यत्र असलें तरी शाळा व सामाजिक कार्याचें केंद्र यांत नित्य निकट संबंध असणें आवश्यक आहे. शिकणारीं मुलें, शिक्षक, मुलांचे पालक व गांवांतील अनेक व्यवसाय करणारे स्त्री-पुरुष हे एकाच समाजाचे अविभाज्य घटक होत. या रीतीनें ग्रामीण जीवनांत सामाजिक कर्तव्याची जाणीव आणि ऐक्य यांचा उदय होईल.

### विद्यार्थ्यांकडे व्यक्तिशः लक्ष

आतां यच्चयावत् शिक्षणाविषयीं आणखी एक विचार सांगून हें विवेचन आटोपतें घेतों. आपलें शिक्षण प्रभावी न होण्याचीं जीं कारणें आरंभीं दाखविलीं आहेत त्यांमध्यें एक लक्षणीय कारण हें कीं विद्यार्थ्यांच्या शारीरिक, मानसिक शिक्षणाकडे व्यक्तिशः लक्ष ( individual attention ) देणें शिक्षकाला शक्य होत नाहीं. ही शिक्षणशास्त्राचे दृष्टीनें मोठी उणीव आहे. शिक्षणाचा हेतु शारीरिक–मानसिक विकास हा आहे. हें कार्य शाळा-कॉलेजांमध्यें केवळ श्रवणपरायण विद्यार्थ्यांना ज्ञानविषय दूरतः शिकवून होणारें नाहीं. सामुदायिक शिक्षणपद्धतीनें सर्वांगीण मनोविकासाची केवळ अल्पमर्यादा गांठली जाते. विद्यार्थ्यांपैकीं प्रत्येकाचें व्यक्तित्व निराळें आहे. त्याच्या जन्मजात प्रवृत्ती निरनिराळ्या आहेत. त्यांची योग्य पारख झाली पाहिजे. शैक्षणिक पुनर्घटनेंत ही गोष्ट सर्वाधिक महत्त्वाची समजली जावी. शिक्षकाला विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्व-विकासाकडे लक्ष देतां येईल अशी परिस्थिति उपलब्ध झाली पाहिजे व शिक्षकानें या गोष्टीला शिक्षणाचें मूलभूत तत्त्व असें मानलें पाहिजे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## शिक्षणाच्या पुनर्घटनेची दिशा

लहान मुलांच्या शिक्षणांत ग्रंथज्ञानापेक्षां शिक्षण-कौशल्य, वात्सल्य, योग्य प्रकारें प्रोत्साहन देण्याची व योग्य संवयी लावण्याची दक्षता पाहिजे; तर मोठ्या मुलांच्या शिक्षणांत जिज्ञासेचें उद्बोधन, ज्ञानविषयांत संशोधन, ज्ञान मिळविण्याचें कामीं स्वतःचा प्रयत्न, विचारस्वातंत्र्य, जीवनाविषयीं साकल्यानें विचार इत्यादि गोष्टींकडे लक्ष देणें जरूर आहे. शारीरिक बौद्धिक व नैतिक विकासाचें योग्य मापन झालें पाहिजे. या दृष्टीनें एका वर्गातील विद्यार्थ्यांची संख्या ३०–३५ हीच योग्य ठरते. अवांतर कारणांमुळें ती वाढविणें अपरिहार्य असल्यास उच्च शिक्षणाच्या विद्यालयांतहि ५० पेक्षां ती अधिक असूं नये.

या लेखांत दर्शविल्याप्रमाणें आपल्या शिक्षणांत मूलोद्योगाला ( Basic Craft ), उत्पादनश्रमाला महत्त्व दिलें जाईल तर त्या पद्धतींत व्यक्तिशः लक्ष पुरविणें ही गोष्ट बरीच साध्य होईल. तेथेंहि इतर विषय शिकवितांना हीच पद्धति स्वीकारली पाहिजे. भौतिक शास्त्रें, अनेक प्रकारच्या यंत्रकला इत्यादि-कांचें शिक्षण देतांना विद्यार्थ्यांच्या केवळ बुद्धि विकासाचाच विचार करून भागणार नाहीं. एकंदर शील व चारित्र्य यांच्या संपादनाकडे लक्ष पाहिजे. या दृष्टीनें वाङ्मयीन व कलात्मक शिक्षणा-( Humanities )ची जोड, विद्यार्थ्यांमध्यें उदार-वृत्ति व समाजदृष्टि, सौजन्य आणि सौंदर्य हे गुण विकसित होण्याकरितां दिली पाहिजे. उलट पक्षीं, वाङ्मयीन शिक्षणांतहि हस्तोद्योग व कृतिपरता यांची आवड उत्पन्न व्हावी याकरितां निदान १४ वर्षांपर्यंत मूलोद्योगाला महत्त्वाचें स्थान देणें आवश्यक आहे. कोणत्याहि प्रकारच्या शिक्षणांत सर्वांगीण व्यक्तित्वा- ( whole personality ) चा विकास व्हावा या दृष्टीनें सर्व प्रकारच्या शिक्षणाची घटना झाली पाहिजे.

पुणें विद्यापीठानें व्यतिशः लक्ष पुरविणारी शिक्षणपद्धति ( tutorial system ) या गोष्टीचा स्वीकार केला आहे ही त्याच्या प्रागतिकत्वाची खूण आहे.

---

## जीवनांतील खरा आनंद

पुष्कळ वर्षें झालीं. बर्नार्ड शॉचे ग्रंथ वाचीत असतांना त्यांतील एका ठिकाणीं, मला आठवतें कीं मला अगदीं उचंबळून आलें. माझे विचार आणि भावना थरारून उठल्या! शॉच्या ग्रंथांतील त्या उताऱ्याचा आशय असा :

" जीवनांत खरा आनंद आहे एकाद्या महान् ध्येयाकरितां आपण खर्ची पडण्यांत; देहाचें अगदीं चिपाड होऊन निरुपयोगी होईपर्यंत झिजून जाण्यांत! 'काय करावें, जगाला आमच्या सुखाची पर्वा नाहीं' अशी नेहमीं चिरचिर करीत, दुखणाईत स्वार्थी अशा आपल्या शरीराचें मडकें वाहण्याऐवजीं आपलें शरीर महान् निसर्गशक्तीचें अधिष्ठान बनविण्यांत खरा जीवनानंद आहे!"

एवढ्या उन्नत भूमिकेवर आरोहण करणें आपणांपैकीं पुष्कळांना अशक्य आहे, हें खरें! पण एकाद्या वेळीं असाही चमत्कार घडून येतो कीं, एक संबंध राष्ट्रच्या राष्ट्र एका महान् नेत्याच्या प्रभावानें, महान् प्रेरणेनें आपली उन्नति करून घेतें, परिस्थितीला आकार देऊं शकतें, आणि आपल्या इच्छेप्रमाणें इतिहास घडवूं शकतें! आपल्या भारतांत असाच चमत्कार घडून आला! भारतीयांच्या चिदाकाशांत महात्मा गांधी अकस्मात् एखाद्या तेजोगोलाप्रमाणें अवतीर्ण झाले, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या मोहिनीनें, त्यांच्या संदेशाच्या जादूनें भारतीयांनीं महान् पराक्रम करून दाखविले.

आज आपला राष्ट्रपिता हयात नाहीं. तरी पण त्यांचीं तत्त्वें आपणापाशीं आहेत. आपण त्यांचींच बाळें आहोंत, त्यांनीं पेटविलेल्या ज्योतीचा स्फुलिंग तरी आपणांजवळ असला पाहिजे. या महान् ऐतिहासिक महत्त्वाच्या कार्यांत आपण सर्व सहप्रवासी आहोंत.

—पं. जवाहरलाल नेहरू, ७–१२–४९



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. शंकरराव देव

# सुशिक्षित मध्यमवर्गाची राज्यनिष्ठा : (१) निधर्मी राज्य ?

१५ ऑगस्ट १९४७ रोजीं या देशांत जें सत्तांतर झालें व त्याचा परिणाम म्हणून काँग्रेस सर्वत्र सत्ताधारी झाली, या घटनेविषयीं मध्यमवर्गीय लोकांची साधारणतः जी मनोवृत्ति दिसते व ते जीं मतें प्रकट करतात त्यांच्या कारणांची ऐतिहासिक दृष्ट्या मीमांसा करण्याचा मागच्या 'नवभारता'च्या मे १९४९ च्या अंकांतील लेखांत अल्पसा प्रयत्न केला. त्या घटनेनें या लोकांचा अपेक्षाभंग झाला इतकेंच नव्हे तर त्यामुळें त्यांचा अहंकार दुखावला जाऊन काँग्रेसचे नेते व त्यांचा राज्यकारभार याकडे पाहण्याची त्यांची दृष्टि उफराटी झाली. पण यावर कोणी असें म्हणूं शकेल कीं, 'कोणाच्याहि कोंबड्याच्या आरवण्यानें सूर्योदय झाला असला तरी एकदां तो झाल्यावर त्याच्या प्रकाशांत सर्वांनीं आपला व्यवहार सुरू करण्यास कोणतीहि हरकत असूं नये. आतां भारत स्वतंत्र झाला आहे तेव्हां जें झालें तें गेलें. मागचें सर्व विसरा व क्षमा करा या वृत्तीनें सर्वांनीं, ज्या सामाजिक मूल्यांच्या प्रस्थापनेसाठीं आपण स्वातंत्र्याची इच्छा करीत होतों, त्या मूल्यांच्या प्रस्थापनेच्या कार्याला मनापासून लागणें हेंच शहाणपणाचें आहे, व श्रेयस्करहि आहे.' पण ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं. कारण वर्तमानकाळ भूतकाळाचें फल आहे व भविष्यकाळाचें बीज आहे. स्वातंत्र्याच्या लढ्यापासून दूर राहिलेल्या मध्यमवर्गीय लोकांना जशीं कांहीं खास कारणें होतीं त्याप्रमाणें स्वातंत्र्याचें संघटन करून नवसमाज स्थापन करण्याच्या कामापासून शरीरानें—निदान मनानें तरी—दूर राहण्यालाहि त्यांना खास कारणें आहेत. तीं कोणतीं तें पहाणें उद्बोधक ठरेल.

## खरी लोकशाही ही धर्मनिरपेक्ष

स्वतंत्र भारताची जी राज्यघटना बनली आहे त्यांत भारत हें एक संपूर्ण प्रभुत्व-संपन्न लोकतंत्रात्मक गणराज्य असून त्यांत धर्मनिरपेक्ष सर्व नागरिकांना सामाजिक आर्थिक व राजनैतिक न्याय मिळेल आणि विचार-स्वातंत्र्य, प्रचार-स्वातंत्र्य आणि धर्म–व–उपासना–स्वातंत्र्य राहील अशी प्रतिज्ञा केली आहे. याचा अर्थ असा कीं, भारतीय राज्यघटनेंत विशिष्ट धर्माचा वा जातीचा म्हणून कोणाहि नागरिकाला श्रेष्ठ अगर कनिष्ठ मानलेला नाहीं व त्याला त्या कारणानें, अधिक किंवा कमी, हक्क अथवा कर्तव्यें राहाणार नाहींत. सर्वांचा दर्जा सारखा राहील. सर्वांना सारखी संधि मिळेल. काँग्रेसच्या भाषेंत बोलायचें तर भारतांतील राज्यघटना वा राज्यपद्धति, जिला कोणत्याहि धर्माचें अधिष्ठान नाहीं अशी निधर्मी लोकशाही (Secular Democracy) आहे. इंग्रजी अंमलाखालीं भारतीय विचारांची ज्या दिशेनें वाढ झाली व विशेषतः काँग्रेसच्या नेतृत्वाखालीं या देशांतील राजकीय जीवनाचें जें स्वरूप बनलें तें लक्षांत घेतां भारतीय राज्य एक निधर्मी लोकशाही राज्य बनणें अपरिहार्य होतें. खरें म्हटलें तर लोकशाहीच्या मागें निधर्मी (Secular) हा शब्द योजण्याची खरोखर कांहींच जरूरी नाहीं. शुद्ध लोकशाही ही धर्म–जाति–वर्ग–निरपेक्ष असली पाहिजे. अशा लोकशाहीचा आधार केवळ 'व्यक्ति' हाच असतो. सर्व व्यक्ती सारख्या असून त्यांना स्वतःचा विकास करण्याला सारखी संधि व साधनें मिळालीं पाहिजेत, हा लोकशाहीचा मूलभूत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सिद्धान्त आहे. धर्म, जाति वा वर्ग यामुळें या समानतेंत कोणत्याहि प्रकारें न्यून येतां कामा नये. व्यक्तीचे गुण वा अवगुण हीच त्याच्या उत्कर्षाची वा अपकर्षाची एकमेव कसोटी असली पाहिजे. नागरिका-नागरिकांमध्यें कसलाहि फरक न करतां त्यांच्या गुणांची वृद्धि होईल व अवगुणांचा क्षय होईल अशा रीतीनें राज्ययंत्र चालविणें व सामाजिक परिस्थिति निर्माण करणें हा लोकशाहीचा धर्म आहे. लोकशाहीचें हें स्वरूप सर्व सुसंस्कृत व सुधारलेल्या लोकांनीं मान्य केलें असून त्या दिशेनें त्यांचा प्रयत्न सुरू आहे. आम्हींहि या पुढारलेल्या लोकांच्या पंगतींत बसूं इच्छितों.

### पाकिस्तानचें मूळ

यावर कोणी असा प्रश्न विचारील कीं, असें आहे तर मग काँग्रेसचे नेते व त्यांच्या विचारांचे इतर लोक लोकशाही शब्दाच्या मागें निधर्मी ( secular ) असा शब्द कां लावतात ? याचें उत्तर, हिंदुस्थानला ज्या परिस्थितींत व ज्या स्वरूपांत स्वातंत्र्य मिळालें, त्यांत आहे. भारताला स्वातंत्र्य मिळालें पण तो दुभंगला. भारत व पाकिस्तान अशीं त्याचीं दोन स्वतंत्र राज्यें झालीं. धर्म, संस्कृति, इतिहास, सामाजिक चालीरीती वगैरेंच्या कसोटीनें पाहिलें तर हिंदू व मुसलमान हे दोन अगदीं भिन्न लोक वा राष्ट्रें असून आपापल्या धर्माप्रमाणें व संस्कृती-प्रमाणें वाढण्याची संधि त्यांना मिळाली पाहिजे व ती तशी मिळावयाची झाली तर त्यांचीं स्वतंत्र दोन राज्यें झालीं पाहिजेत, या मुस्लिम लीगच्या मागणींत पाकिस्तानचें मूळ आहे. मुस्लिम लीगच्या मागणीला जे आधारभूत सिद्धान्त होते त्यांत किती सत्य आहे हा आज महत्त्वाचा मुद्दा नाहीं. प्रत्यक्षांत हे सर्व सिद्धान्त सर्वथा असत्य असले तरी ते खरे आहेत असे भारतांतील मुस्लिम समाजांतील बहुसंख्याक लोकांना पटवून देण्यांत मुस्लिम लीगला शंभर टक्के यश आलें ही गोष्ट कोणीहि अमान्य करणार नाहीं. "इंग्रजांचें राज्य नष्ट करण्यांत काँग्रेसला यश आलें तर त्या ठिकाणीं जें राज्य होईल तें भारतां-तील सर्व लोकांचें ( काँग्रेसच्या भाषेंत बोलावयाचें तर हिंदु, मुसलमान, पार्शी, शीख, ख्रिश्चन, वगैरेंचें ) राज्य होणार नाहीं तर बहुसंख्याक जे हिंदू त्यांचें राज्य होईल व या हिंदूंच्या राज्यांत आपला धर्म, संस्कृति, सामाजिक परंपरा व चाली-रीती, आपली भाषा, लिपि, वाङ्मय सर्व नष्ट होऊन आपण हिंदूंचे गुलाम होऊं; म्हणून हिंदुस्थानच्या ज्या भौगोलिक भागांत मुसलमानांचें बहुमत आहे त्या भागांचें एक स्वतंत्र पाकिस्तानचें राज्य निर्माण झालें पाहिजे " या मुस्लिम लीगच्या प्रचाराला या देशांतील बहुसंख्याक मुसलमान बळी पडले व त्यांनीं मुस्लिम लीगच्या या मागणीला पाठिंबा दिला. या गोष्टीचा परिणाम असा झाला कीं स्वातं-त्र्याच्या शेवटच्या लढ्यांत हे मुसलमान तटस्थ राहिले व ४२ सालच्या लढ्यानंतर मध्यवर्ती व प्रांतिक कायदे-मंडळांच्या ज्या निवडणुका झाल्या त्यांत मुसलमान समाज मुस्लिम लीगच्या मागें उभा आहे असेंच जवळ जवळ सिद्ध झालें. सरहद्द प्रांतांतील खानबंधू व त्यांचे खुदाई खिदमतगार हे अखेरपर्यंत काँग्रेसमध्यें राहिले व सरहद्दप्रांतांत त्यांचें बहुमत होतें हें खरें. त्याचप्रमाणें बहुसंख्याक मुसल-मानांचे प्रांत जे सिंध, पंजाब, बंगाल त्यांत कांहीं वजनदार मुसलमान पुढारी व त्यांचे अनुयायी शेवट-पर्यंत मुस्लिम लीगला विरोध करीत होते हेंहि खरें. त्याचप्रमाणें काँग्रेसमध्यें मौलाना अबुल कलम आझाद यांच्या नेतृत्वाखालीं एक राष्ट्रीय मुस्लिम गट अखेर-पर्यंत राष्ट्रीय भावनेला इमानी राहिला व स्वातं-त्र्याच्या यज्ञांत त्यानें आपल्या वांट्याची आहुति दिली, हेंहि खरें. तथापि, हें मान्य केलें पाहिजे कीं, मुस्लिम लीगनें उसळविलेली पाकिस्तानची लाट थोपवून धरण्यांत हे सर्व असमर्थ ठरले. भारताची हवा पाकिस्तानच्या विषारी वायूनें इतकी कुंद झाली कीं, त्यांत भारताचा प्राण गुदमरून जातो कीं काय अशी भीति वाटण्यासारखी परिस्थिति १९४६–४७ अखेर निर्माण झाली.

### अराजक टाळण्याकरितां तडजोड

काँग्रेसनें मुस्लिम लीगचा द्विराष्ट्रवाद केव्हांच मान्य केला नाहीं. धर्म किंवा धर्मांतर भिन्नराष्ट्रीय-त्वाचें लक्षण मानणें केवळ मूर्खपणा आहे असेंच तिचें प्रारंभापासूनचें मत होतें व अखेरपर्यंत तिनें मुस्लिम लीगच्या या घातकी मताला कसून विरोध केला. पण तिला परिस्थितीला शेवटीं शरण जावें लागलें व पाकि-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्तानची मागणी मान्य करावी लागली, हें कबूल केलें पाहिजे. यांत कॉंग्रेसचा दोष किती, इंग्रजांचा हात किती व परिस्थितीची मात किती याचा निर्णय इतिहासच देईल. मुस्लिम लीगचें धोरण, प्रचार व कृति यांमुळें या देशांत अशी परिस्थिति निर्माण झाली कीं, शांततेनें सत्तांतर व्हावयाचें तर मुस्लिम-लीगची पाकिस्तानची मागणी मान्य केली पाहिजे; नाहीं तर अराजक व त्याचे दुष्ट परिणाम यांना तोंड देण्यास तयार झालें पाहिजे. भारतीय मन आज या जगांत कोणत्या एका गोष्टीला भीत असेल तर तें अराजकाला. भारताचा इतिहास याला कारण आहे. या भीतीला भारताच्या इतिहासांत खरोखर कांहीं आधार आहे किंवा नाहीं, हा एक वादाचा प्रश्न होऊं शकतो व आहेहि; परंतु या वादांत आज उतरणें फायद्याचें नाहीं, व त्यासाठीं जरूर ती फुरसदहि नाहीं. कॉंग्रेसनें पाकिस्तानला मान्यता दिली. पंजाबमधील शीख, बंगालमधील हिंदू-पुढारी यांचा या निर्णयाला पाठिंबा होता हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. भारत स्वतंत्र झाला पण दुभंगला. मुस्लिम लीगनें संपूर्ण पंजाब, संपूर्ण बंगाल, व आसाम पाकिसतनांत आला पाहिजे ही आपली मागणी सोडली व सरहद्द, बलुचिस्तान, सिंध, पश्चिम पंजाब, व पूर्व बंगाल म्हणजे बहुसंख्याक मुस्लिम वस्ती असलेला पंजाबचा व बंगालचा हिस्सा यांचें पाकि-स्तान बनलें. कॉंग्रेसनें मुस्लिम लीगच्या द्विराष्ट्र-वादाच्या सिद्धान्ताला मान्यता दिली नाहीं ही गोष्ट खरी, पण भारताच्या नैर्ऋत्य व ईशान्य भागांत जेथें मुसलमानांची बहुसंख्याक वस्ती आहे ती अलग करून त्यांचें एक स्वतंत्र पाकिस्तानचें राज्य करण्याला तिनें संमति दिली. धार्मिक व भौगोलिक तत्त्वांच्या मिश्रणांतून पाकिस्तानचें हें रसायन तयार झालें होतें. जीवनांत–विशेषतः राजकारणांत–नेहमीं जें घडतें तेंच येथें घडलें होतें. ही एक तडजोड (compromise) होती. पाकिस्तानांत व भारतांत अनुक्रमें मुसलमान व हिंदु बहुसंख्याक नागरिक असले तरी दोन्हीहि देशांत हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन, शीख वगैरे धर्मांचे अनुयायी अल्पसंख्येंत राहणार होते. व कराराप्रमाणें सर्व नागरिकांचा अधिकार व दर्जा समान रहाणार होता, पण कर्माचा कायदा अटळ आहे. अनेक वर्षांपासून मुस्लिम-लीगनें जो द्विराष्ट्रवादाचा विषारी प्रचार केला होता त्याचीं कटु फळें दोन्ही देशांना चाखावीं लागलीं. ''क्षिप्रंहि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा'' । भारतांत सत्तांतर होऊन पाकिस्तान व हिंदुस्थान अशीं दोन स्वतंत्र राज्यें निर्माण होण्याच्या पूर्वी व पश्चात् या देशांत अमानुष कत्तल, भयंकर अत्याचार, स्त्रियांवर पाशवी अनाचार, जाळपोळ असे अनेक मानवतेला कलंकभूत आसुरी प्रकार घडले व पाकिस्तानांतून लाखों हिंदू व हिंदुस्थानांतून लाखों मुसलमान निर्वासित होऊन हिंदुस्थानांत आले व पाकिस्तानांत गेले. मूळच्या कराराच्या आशयाप्रमाणें पाकि-स्तानांत हिंदू व हिंदुस्थानांत मुसलमान समान दर्जाचे नागरिक म्हणून राहूं शकतात हें तत्त्व वास्त-विक अमलांत येऊं शकतें किंवा नाहीं या प्रश्नाचा अद्याप निर्णय लागला नाहीं. भारत व पाकिस्तान यांच्यामध्यें एप्रिलच्या सुरुवातीला जो करार झाला तो दोन्हीहि पक्ष प्रामाणिकपणें पाळतील तर या प्रश्नाचें अस्तिपक्षीं उत्तर मिळेल. दुर्दैवानें तो पाळला जाणार नाहीं तर या प्रश्नाचें नास्तिपक्षीं उत्तर ठेवलें आहे असें समजावें.

## दोन घटनापरिषदांतील भिन्न ध्येयें

या बाबतींत हिंदुस्थान व पाकिस्तान यांमध्यें विलक्षण फरक आहे. वर लिहिल्याप्रमाणें कॉंगेसनें मुस्लिम लीगचा द्विराष्ट्रवादाचा सिद्धान्त कधींच मान्य केला नव्हता व १५ ऑगस्ट १९४७ पूर्वी व नंतर पाकिस्तानांत व हिंदुस्थानांत जे अमानुष प्रकार घडले त्यानें ती आपल्या तत्त्वापासून विचलित झाली नाहीं. आजहि कॉंग्रेस आपल्या तत्त्वावर दृढ राहिली आहे–भारताचें संघराज्य व इतर सर्व राज्यें यांत कॉंग्रेसचीच सत्ता असल्यामुळें हिंदुस्थानांतील सर्व सरकारें कॉंग्रेसच्या या धोरणामुळें आपल्या नागरि-कांना धर्म–पंथ–जाति–निरपेक्ष समान दर्जानें वागविण्याचा आपल्याकडून शक्य तों प्रयत्न करीत आहेत. भारताची राज्यघटना याच तत्त्वावर आधारलेली आहे.

हिंदुस्थान व पाकिस्तान या दोन स्वतंत्र राज्यांच्या जन्माच्या वेळीं ब्रिटिश सरकार, कॉंग्रेस आणि मुस्लीम लीग यांच्यामध्यें वाटाघाटी सुरू असतांना ' दोन्हीहि



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राज्यांतील अल्पसंख्याक जमातींचा हित-व-हक्क रक्षणाची ब्रिटिश सरकारनें काय तरतूद केली आहे' असा प्रश्न लॉर्ड माउंटबॅटन यांना ता. ४ जून १९४७ रोजीं भरलेल्या पत्रकार-परिषदेंत विचारला गेला असतां त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तर दिलें—" ब्रिटिश सरकारची जी योजना आहे तिच्यांत या बाबीचा उल्लेख असण्याची आवश्यकता नाहीं. हिंदुस्थान सोडून जाण्याचा ब्रिटिश सरकारचा हेतु मनापासून आहे. असें असल्यामुळें अल्पसंख्याकांचें रक्षण करण्याची केलेली तरतूद अंमलांत आणण्याला त्याच्याजवळ कसलेंहि कायदेशीर साधन वा अधिकार नाहीं. तथापि, मी या देशाच्या नेत्यांशीं बोललों आहे आणि मला असा पूर्ण विश्वास आहे कीं जोंपर्यंत ते सत्ताधारी आहेत तोंपर्यंत आपल्या मनोदेवतेला स्मरून ते, अल्पसंख्याकांना न्याय मिळेल व त्यांच्या हितसंबंधांचें रक्षण होईल, अशी खबरदारी घेतील व त्यासाठीं जरूर तर आपली प्रतिष्ठा पणाला लावतील."

पण पाकिस्तानचे निर्माते द्विराष्ट्रवाद मानणारे होते व त्यांनीं या सिद्धान्ताच्या प्रचारानेंच मुस्लिम समाजाची निष्ठा व शक्ति आपल्या मागणीच्या पाठीमागें उभी केली होती ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. पाकिस्तानघटनापरिषदेनें आपलें ध्येय जाहीर करणारा जो ठराव केला आहे त्याचा प्रारंभ " अल्ला " चें नांव घेऊन केला आहे. भारतीय घटनापरिषदेंत ईश्वरावरील श्रद्धा जाहीर करण्याबाबत वादविवाद होऊन अखेर हा प्रश्न येथें उत्पन्न करूं नये असें मोठ्या बहुमतानें ठरविण्यांत आलें, हें येथें लक्षांत ठेवणें जरूर आहे. पाकिस्तानच्या राज्यांत इस्लामनें उद्घोषित केल्याप्रमाणें लोकशाही, स्वातंत्र्य, समता, सहिष्णुता व सामाजिक न्याय या तत्त्वांची अंमलबजावणी होईल व कुराणांत मुसलमानांचें वैयक्तिक व सांघिक जीवन जसें असावें अशी आज्ञा आहे तसें जीवन जगणें मुसलमानांना शक्य व्हावें अशी व्यवस्था केली जाईल असें या ठरावांत स्पष्ट म्हटलें आहे. अर्थात् अल्पसंख्याक जमातींना आपल्या धर्माप्रमाणें वागण्याचें व आपल्या संस्कृतीचा विकास करण्याचें स्वातंत्र्य राहील अशी अवश्य ती व्यवस्था केली जाईल असेंहि आश्वासन या ठरावांत दिलें आहे. तथापि, या ठरावांत पाकिस्तानच्या राष्ट्रांत इस्लाम व त्यांचे अनुयायी यांचा एक वेगळा दर्जा राहील असा स्पष्ट इशारा आहे, ही गोष्ट नाकारण्यांत हंशील नाहीं. भारतीय राज्यघटना असें जाहीर करते कीं, भारतीय राज्याला सर्व धर्म समान असून आपल्या राज्यांतील अनेक धर्मांपैकीं कोणताच धर्म आपला नाहीं व कोणत्या एक विशिष्ट धर्माप्रमाणें वागणें वा त्याला प्रोत्साहन देणें आपलें काम नाहीं. याच्या उलट इस्लाम आपला धर्म आहे व त्याच्या अनुयायांच्या बाबतींत आपलें खास निश्चित असें कर्तव्य ( positive duty ) आहे असा पाकिस्तानघटनापरिषदेच्या घेयाचा ठराव निःसंदेह जाहीर करीत आहे. असें आहे म्हणूनच पाकिस्तान हें एक धर्माधिष्ठित ( Theocratic) राज्य आहे असें म्हटलें तर तें वावगें होईल असें नाहीं.

### लियाकतअलींचा खुलासा

एप्रिलच्या पहिल्या आठवड्यांत भारताचें व पाकिस्तानचे प्रधानमंत्री यांच्यामध्यें जो करार झाला त्यावर पाकच्या पार्लमेंटमध्यें भाषण करतांना पाकिस्तानचे प्रधानमंत्री श्री. लियाकतअली खान यांनीं पाकिस्तान धर्माधिष्ठित राज्य आहे या विधानाचा जोरानें इन्कार केला असून या विधानाचा पुनः पुनः उच्चार करण्यानें अल्पसंख्याक जमातींच्या मनाची शांति नष्ट होते असें म्हटलें आहे. ते म्हणतात : " इस्लामिक स्टेट या कल्पनेचा ज्यांना बरोबर बोध झालेला नाहीं असे लोक वारंवार अशी भीति प्रदर्शित करतात कीं, असें राज्य धर्माधिष्ठित राज्य होईल व अशा राज्यांत राहाणाऱ्या अल्पसंख्याक जमातींना समान दर्जा, हक्क व नागरिकत्व मिळणार नाहीं. पाकच्या घटना-परिषदेनें ध्येयाबाबत जो ठराव केला आहे त्याचा जो कोणी अभ्यास करील त्याला ही गोष्ट स्पष्ट होईल कीं, इस्लामिक राज्याची कल्पना, धर्मनिरपेक्षतेनें सर्व नागरिकांना स्वातंत्र्य, समता व सामाजिक न्याय सारखा मिळेल, या तत्त्वावर आधारलेली आहे. त्याचप्रमाणें बहुसंख्याक व अल्पसंख्याक दोन्हीहि



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जमातींच्या संस्कृतींचें, जीवनपद्धतीचें रक्षण करण्याचीहि त्यांत तरतूद आहे. मला अशी आशा आहे कीं, पाकिस्तान हें एक धर्माधिष्ठित राज्य आहे व त्यांत नागरिक-नागरिकांमध्यें भेद केला जातो ही भाषा यापुढें अजिबात बंद होईल." शेवटच्या इच्छापत्रा-( Will ) नें पूर्वीचीं सर्व इच्छापत्रें रद्द होतात या न्यायानें पाकिस्तान हें धर्माधिष्ठित राज्य नसून त्या धर्मनिरपेक्ष राज्यांत सर्व नागरिक सारखे आहेत, म्हणजेच तें निधर्मी राज्य आहे, या पाकिस्तानच्या पंतप्रधानांच्या निःसंदिग्ध घोषणेनें पूर्वीच्या त्यांच्या व त्यांच्या सहकाऱ्यांच्या याविषयींच्या सर्व घोषणा रद्द आहेत.[1] इस्लामिक राज्याच्या कल्पनेचा नीट बोध न झाल्यामुळें आजपर्यंत लोकांनीं पाकिस्तान हें धर्माधिष्ठित राज्य आहे असें मानण्यांत मोटी भूल केली आहे असें आपण विनयानें कबूल करूं या. ' निधर्मी राज्याच्या कल्पनेला चिकटून राहण्याचें कर्तव्य भारत करील तर एक दिवस असा उजाडेल कीं, जेव्हां पाकिस्तानला त्याच मार्गावर पाऊल टाकावें लागेल ' असें महात्मा गांधींना ऑ. इं. कॉं. कमिटीच्या नोव्हेंबर १९४७ च्या अधिवेशनांत उद्‌गार काढले होते. कोणी सांगावें कीं हीं तीन वर्षांपूर्वी उच्चारली गेलेली संताची वाणी सत्य ठरण्याची वेळ आली नसेल !

भारतीय राज्य व कॉंग्रेस यांनीं निधर्मी राज्याचें ध्येय आपणांपुढें ठेवून त्याप्रमाणें वागण्याचा ते प्रयत्न करीत आहेत; परंतु भारतांतील सर्व लोकांनीं या ध्येयाला आपली मान्यता दिली आहे असें मानणें चुकीचें होईल.

## द्विराष्ट्रवादाच्या सिद्धान्ताचा जन्म

द्विराष्ट्रवादाच्या सिद्धान्ताच्या जन्माचें श्रेय बॅ. जिना व मुस्लिम लीग यांना द्यावयाचें कीं बॅ. सावरकर व हिंदुमहासभा यांना द्यावयाचें याबद्दल दोन मतें होण्याचा संभव आहे. पण ही गोष्ट कोणीहि अमान्य करूं शकणार नाहीं कीं, बॅ. सावरकर यांनीं या सिद्धान्ताचा बॅ. जिनांपेक्षां अधिक नसला तरी तितकाच हिरीरीनें या देशांत प्रचार केला आहे. बॅ. सावरकरांची ' हिंदूडम् 'ची कल्पना व बॅ. जिना यांची ' इस्लामिक स्टेट 'ची कल्पना यांत अधिक दुष्ट कल्पना कोणती हें ठरविणें जरा कठिणच आहे. बॅ. सावरकर अनेक वर्षें हिंदुराष्ट्रपति होते व त्यांच्या कारकीर्दींत हिंदुसभा आक्रमणशील होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हिंदुमहासभा प्रत्यक्ष राजकारणांत कॉंग्रेसच्या तुलनेनें कधींच प्रभावी झाली नाहीं व तिला हिंदु समाजाचें सनदशीर प्रतिनिधित्व करण्याची संधि कधींच मिळाली नाहीं हें खरें. पण हिंदुमहासभापुरस्कृत राजकारणांतील जातीय धोरणाचा हिंदू मनावर—विशेषतः सुशिक्षित मध्यम वर्गीय लोकांच्या मनांवर कांहींच परिणाम झाला नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. कॉंग्रेसचें अल्प-

---

१ पाकिस्तानच्या पंतप्रधानांनीं नुकतेंच (४-५-५०) अमेरिकेच्या सीनेट व हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह्ज् यांच्या संयुक्त सभेपुढें भाषण केलें, त्यांतील पुढील उतारा पाहा :

" There was no room for theocracy in Pakistan...... Islam stood for freedom of conscience, condemned coercion, abhorred the caste system and had no priesthood......We have pledged that the Muslims in our state shall be enabled to order their lives in accordance with their faith, but not forgetful of that perpetual fear of the majority from which Pakistan has delivered millions of Muslims and in humble thanksgiving to God for this deliverance. We have solemnly pledged that our minorities shall enjoy full rights of citizenship and shall freely profess and practise their religions and develop their culture and that their legitimate interests and the interest of the Backward and Depressed classes shall be adequately safeguarded."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संख्याक जमातीबद्दलचें, विशेषतः मुसलमान समाजाविषयींचें धोरण या वर्गातील पुष्कळ लोकांना केव्हांच मान्य झालें नाहीं. मुसलमान समाजाविषयींच्या काँग्रेसच्या धोरणाला "मनधरणीचें (मुसलमानधार्जिणें) धोरण" (appeasement policy) म्हणून हे लोक नांवें ठेवीत व त्याचा मनानें नेहमींच व मुखानें प्रसंगवशात् निषेध करीत. उलट पक्षीं काँग्रेसचें अल्पसंख्याक जमातीविषयींचें धोरण अमान्य असूनहि यापैकीं अनेक लोक सरकाराविरुद्ध चालविलेल्या या स्वातंत्र्याच्या लढ्यांत काँग्रेसला मदत करीत, एवढेंच नव्हे तर कायदेमंडळाच्या निवडणुकींत मताचें दानहि काँग्रेसच्या पदरांत टाकीत. याचें कारण स्वातंत्र्यप्राप्तीच्या पूर्वी हिंदी मन जर कोणत्या एका विचारानें व भावनेनें विलक्षण प्रभावित होत असेल तर तें राष्ट्रीयत्वाच्या व स्वातंत्र्याच्या भावनेनें. ती भावना आतां कृतार्थ झाली असून विराम पावली आहे. धर्म, संस्कृति, सामाजिक, राजकीय व आर्थिक संस्था कशा असाव्यात, कोणासाठीं असाव्यात व त्यासाठीं मिळालेल्या सत्तेचा कसा व कोणी उपयोग करावा या प्रश्नांकडे मुख्यत्वें लोकांचें लक्ष लागलें आहे. अशा वेळीं देशांतील निरनिराळ्या धर्मांच्या व जातींच्या लोकांचे सत्तेशीं व परस्परांशीं काय संबंध असावेत हा फार महत्त्वाचा प्रश्न बनतो. काँग्रेसचीं या विषयींचीं मतें निश्चित आहेत. निधर्मी लोकशाही या शब्दांत ती ग्रथित झालीं आहेत. पण स्वातंत्र्यप्राप्तीच्या पूर्वी काँग्रेसचें अल्पसंख्याक जमातीबद्दलचें—विशेषतः मुसलमानजमातीबद्दलचें धोरण ज्या हिंदुमहासभावाद्यांना वा त्यांच्या विचारांच्या छायेंत वाढलेल्या मध्यमवर्गीय लोकांना अमान्य होतें त्यांना निधर्मी लोकशाही हा विचार रुचणें कठिण आहे.

### रा. स्व. संघाचा प्रचार

हिंदु समाजांत द्विराष्ट्रवादाच्या सिद्धान्ताला किती स्थान मिळालें आहे याचा विचार करतांना राष्ट्रीय स्वयंसेवकसंघासारख्या संस्थांचाहि विचार करणें अपरिहार्य आहे. या संस्थेचा हिंदुमहासभेशीं वा राजकारणाशीं कांहींहि संबंध नाहीं अशी स्पष्ट घोषणा संघचालकांनीं केली आहे, ही गोष्ट खरी; पण जे 'अंदरकी बात' जाणतात त्यांना हें माहीत आहे कीं, या दोन संस्थांचा घटनात्मक कांहींहि संबंध नसला तरी ते दोघेहि एकाच ध्येयवादाच्या ताटांत भोजन करतात. संघाचा राजकारणाशीं काडीचाहि संबंध नसून तो एक संस्कृतिप्रचारक संघ आहे असें सांगितलें जातें. कागदावर तसें आहे हें कोण नाकबूल करील? पण सरसंघचालक गोळवलकर गुरुजी यांचा 'आम्ही' हा ग्रंथ ज्यांच्या वाचण्यांत आला असेल, त्यांना या शुद्ध संस्कृतिसंघटनेच्या पोटीं कोणतीं रसाळ गोमटीं फळें येणार आहेत याची सहज कल्पना करतां येईल. हा ग्रंथ वाचीत असतांना त्याला येणारा दर्प-दुर्गंध व अन्य समाजाबद्दलची हीन भावना पाहिली म्हणजे हिटलरच्या 'Mein Kampf' चें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं. हिंदु समाजाचें पुनरुत्थान हें संघाचें ध्येय आहे व तें सांस्कृतिक, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रापुरतें मर्यादित असेल तर तत्त्वतः त्याबाबतींत निधर्मी लोकशाहीच्या दृष्टीनें सुद्धां विशेष वावगें आहे असें म्हणतां येणार नाहीं. तरी पण राजकारणाच्या क्षेत्रांतच नव्हे तर इतर क्षेत्रांतही अशा प्रकारचे जातीय संघटनांचे प्रयत्न देशांत जातीय भावना वाढविण्याला व अखेर राजकारणांतहि परस्परांमध्यें तेढ उत्पन्न करण्याला कारणीभूत झाल्याशिवाय राहणार नाहींत. ज्या ठिकाणीं निधर्मी लोकशाहीचें बीज आपण रोंविलें आहे तेथें निरनिराळ्या जमातींचे सांस्कृतिक, शैक्षणिक वगैरे प्रयत्नहि संयुक्त झाले तर उत्तम. एक विहीर वा तळें आणि त्याचे अनेक पाट असें खरोखर असलें पाहिजे. पण गुरुजींच्या या 'आम्ही' मध्यें जें लिहिलें आहे त्यापेक्षां जें लिहिलें नाहीं त्याचाच वाचकांच्या मनावर अधिक विपरीत परिणाम होतो. भारतांतील निरनिराळे धर्म व जाती मिळून एक राष्ट्र ही कल्पना मूर्खपणाची आहे व हिंदुस्थानामध्यें हिंदूंचेंच एक राष्ट्र असूं शकतें व असलें पाहिजे हें 'आम्ही' चें सार आहे. परिस्थितीपुढें कांहीं काळ नमतें घेणें निराळें आणि मनांतून एखादी गोष्ट अजिबात काढून टाकणें निराळें. सांप्रत राष्ट्रीय स्व. से. संघाच्या प्रचाराच्या प्रभावांत सापडलेले पुष्कळ मध्यमवर्गीय लोक आहेत.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संघाच्या वृक्षाचें मूळ जरी महाराष्ट्रांत लावलें गेलें असलें तरी आतां त्याचा मोठा वृक्ष झाला असून त्याची छाया भारताच्या पुष्कळ मोठ्या भागावर पडली आहे. या छायेंत ज्यांचीं मनें वाढलीं आहेत ते सर्व लोक हिंदुस्थान हिंदूंचा असें प्रामाणिकपणें मानणारे आहेत. ज्या राज्याचा आधारभूत सिद्धान्त निधर्मी लोकशाही हा आहे, त्या राज्याबद्दल अशा लोकांना कशी निष्ठा वाटावी ? Promised Land कडेच त्यांचे डोळे लागलेले असणें स्वाभाविक आहे. राष्ट्रपित्याची हत्या केवळ एका माथेफिरूचें पिसाट कृत्य नाहीं; त्याच्यामध्यें विशिष्ट ध्येयवाद व विशिष्ट कार्यक्रम खास आहेत.

## निर्वासितांची मनोवृत्ति

याशिवाय द्विराष्ट्रवादाच्या सिद्धान्तानें पेटविलेल्या होमकुंडांत ज्यांनीं आपलीं घरेंदारें, जमीनजुमला, आया-बहिणी इत्यादि सर्वस्वाची आहुति दिली आहे व जे निर्वासित झाले आहेत असे लाखों हिंदू व शीख पाकिस्तानांतून भारतांत आले असून सर्वत्र पसरले आहेत. आपण निर्दोषी असतांना आपल्याला संकटांचे आघात सोसावे लागले किंवा क्लेश आणि यातना सहन कराव्या लागल्या अशी ज्यांची समजूत असेल अशा लोकांमध्यें जर सद्वस्तूवर श्रद्धा नसेल, अंगीं विनय नसेल तर त्यांची वृत्तिसुद्धां उफराटी बनते. शिवाय निर्वासितांची ही मनोवृत्ति त्यांच्यापुरतीच मर्यादित राहाणें शक्य नाहीं. ज्या ज्या स्त्री-पुरुषांशीं त्यांचा संबंध येईल त्यांची मनोवृत्ति ही स्पर्शजन्य रोगाप्रमाणें अशीच बनल्याशिवाय कशी राहील ?

## मानसशास्त्रीय दृष्ट्या एक उद्बोधक समस्या

भारत हें एक निधर्मी राज्य असल्यामुळें त्याच्यांत अनेक अन्यधर्मीयांप्रमाणें लाखों-करोडों मुसलमानहि राहतात हें लक्षांत ठेवलें पाहिजे. दैवदुर्विलास असा कीं, अल्पसंख्य मुसलमान प्रांतांतील हे सर्व मुसलमान बहुसंख्याक मुसलमान प्रांतांतील मुसलमानांपेक्षां अधिक कट्टर असे लीगी व पाकिस्तानी मुसलमान बनले होते. मानसशास्त्राच्या दृष्टीनें या विषयाचा अभ्यास मनोरंजक तसाच उद्बोधक ठरेल. या लोकांनीं पाकिस्तानच्या मागणीला खरोखर कसून विरोध करावयास हवा होता. कारण पाकिस्तान झालें तर या अल्पसंख्य मुसलमानांचा कांहीं खास फायदा होणार होता अशांतला मुळींच भाग नव्हता. उलट, झालें तर नुकसानच नुकसान होणार होतें; कारण मुस्लिम लीगच्या पाकिस्तानच्या मागणींत धर्माच्या आधारावर लोकसंख्येची अदलाबदल ( transfer of population ) ही मागणी नव्हती, हें येथें लक्षांत ठेवणें जरूर आहे. पाकिस्तानला गोड फळ आलें तर तें पाकिस्तानांतील मुसलमानांच्या पदरांत आणि जें कडू फळ येईल तें हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या पदरांत ही परिस्थिति न जाणण्याइतके हे मुसलमान, विशेषतः त्यांचे नेते मंदबुद्धि होते असें मानणें कठीण आहे. बॅ. जिना, नवाबजादा लियाकतअली खान, खलिक उझ्झमान हे व अशांसारखे धुरंधर, महामति नेते अल्पसंख्य मुस्लिम प्रांतांतीलच होते. हिंदु-मुसलमानांचा प्रश्न सोडविण्याला पाकिस्तानची निर्मिति कशी समर्थ होणार, हें पाकिस्तान जन्माला येईपर्यंत पाकिस्तानचा कोणीहि कट्टर पुरस्कर्ता सामान्य बुद्धीलाहि पटवून देऊं शकला नाहीं.

या सर्व गोष्टी डोळ्यांपुढें स्पष्ट दिसत असूनहि अल्पसंख्य मुस्लिम प्रांतांतील मुस्लिम जनतेनें पाकिस्तानच्या मागणीचा धर्मवेड्या वृत्तीनें पुरस्कार केला व त्यासाठीं आपलें सर्व बळ एकवटलें. याचा मानसशास्त्राच्या दृष्टीनें एक खुलासा ( explanation ) मिळूं शकतो. मानवी मनाचा असाहि एक स्वभावविशेष दिसून येतो कीं, जें सुख आपणां स्वतःला घेतां येत नाहीं तें दुसरा घेत असतांना पाहण्यांत त्याला सुख ( vicarious pleasure ) होत असतें. त्याचप्रमाणें स्वतःला जर सूड घेतां येत नसेल तर तो दुसऱ्यानें घेतलेला ( vicarious vengeance ) पाहण्यांत माणसाला मौज वाटत असते. म्हणून भारतांतील मुसलमानांची आतांपर्यंत पाकिस्तानच्या प्रचारावर पोसलेली मनोवृत्ति एका चुटकीसरशी बदलून ते भारतीय राज्यसंस्थेशीं मनापासून एकनिष्ठ बनतील असें मानणें जरी तर्कशुद्ध असलें तरी तशी अपेक्षा करणें म्हणजे मानवी मनाला ताण सहन न होण्याइतकें तें अस्वाभाविक होईल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. दुर्गा भागवत

# डॉ. केतकरांचा समाजशास्त्रविषयक दृष्टिकोन

### ज्येष्ठ समाजशास्त्रज्ञ

डॉ. केतकर हे भारताचे पहिले व अद्यापहि एकापरीनें अद्वितीय असलेले समाजशास्त्रज्ञ आहेत. १९१० सालीं डॉ. केतकरांनीं जेव्हां समाजशास्त्रांतील डॉक्टरेटची पदवी घेतली, त्या वेळीं इंग्लंडांतहि, ज्या मिल-स्पेन्सरच्या इंग्लंडांत समाजशास्त्र, विचारवंतांना उपेक्षणीय वाटत नव्हतें तेथें देखील स्पेन्सरच्या कष्टमय जीवितयात्रेची अखेर पाहिली असतां, तें आदरणीय झालेलें नव्हतें. आंग्ल लोकांनीं जगाच्या मागसलेल्या लोकांशीं वागतांना केलेलें गर्ह्य वर्तन स्पेन्सरनें आपल्या देशबांधवांपुढें मांडल्यापासून स्पेन्सरबद्दलच्या इंग्लंडांतल्या आदराला बरींच वर्षें ओहोटी लागली होती. पण याच आंदोलनांतून समाजशास्त्राचा अभ्यास पद्धतशीर होऊन इंग्लंडचें वैशिष्ट्य कायम राखण्याच्या हेतूनें इंग्लंडांतल्या विश्वविद्यालयांत समाजशास्त्र हा विषय १९१३ सालीं सुरू झाला. या विद्यापीठीय टांकसाळींत अर्थात् जेत्यांस अनुकूल अशा भावनांची व ध्येयांची जोपासणी करण्याच्या धोरणानें अभ्यासाची बांधणी आंखली गेली आणि त्यामुळें ब्रिटनमधला समाजशास्त्राचा अभ्यास सांचेबंद झाला. डॉ. केतकरांनीं ज्ञानकोशमंडळाच्या इतिहासांत ही हकीकत सांगितलेली आहे. ब्रिटिशप्रणीत समाजशास्त्र मुळांतच साम्राज्यपोषक असल्यामुळें नानातऱ्हांचे प्रयोग करून, ठिकठिकाणीं प्रादेशिक संस्कारांचें अवलोकन करून समाजशास्त्राचीं [illegible]तंत्र गमकें बनवावींत, ह्या वृत्तीला, ज्ञानाच्या या[illegible] निबंध उपासनेला, प्रयोगशीलतेला, ब्रिटिश [illegible]नांकडून अगर हिंदुस्थानांतल्या [illegible]श्चात्य सम[illegible]श्व[illegible]ाननी करून केतकरांनी विद्यालयीन अधिकाऱ्यांकडून प्रोत्साहन मिळणें शक्यच नव्हतें. उलट डॉ. केतकरांनीं 'तत्त्वांचें करण्यास परीक्षण होती प्रयोग जगतीं' या ब्रीदवाक्यास अनुसरून आपल्या देशबांधवांच्या गरजा पाहून, त्यांचा दृष्टिकोन लक्षांत घेऊन लेखणीचें व्रत घेतलें. हिंदुजाती व कायदे यांच्यावर लेखन करून प्रगल्भ झालेली आपली लेखणी 'स्वत्वस्थापना'च्या पवित्र कार्यासाठीं त्यांनीं 'ज्ञानकोशाला' म्हणजेच 'प्रगत जग व अप्रगत हिंदुस्थान' यांतील अंतर तोडण्याच्या प्रयत्नाला वाहिली. अमेरिकेंत नाना शास्त्रांची तोंडओळख करून नेमकें समाजशास्त्रच डॉ. केतकरांनीं स्वतःकरतां निवडून घेतलें. अमेरिकेंत बॉंबची विद्या शिकून राजकीय क्रांतीच्या चळवळीसाठीं वाहून घेण्याच्या हेतूनें पदार्पण केलेल्या या विद्यार्थ्यानें क्रांतिकारक चळवळीचें वैफल्य व निःशस्त्रांच्या राजकारणाचें शांततामय पण दीर्घप्रयत्नी सूत्र ओळखलें. त्याचाच पुरस्कार करण्यासाठीं, पहिल्यानें देशांत योग्य दिशेनें देशप्रेम निर्माण केलें पाहिजे, त्यासाठीं पहिल्यांदा विचारांची स्वतंत्र दिशा विद्येच्या द्वारें तयार केली पाहिजे आणि ती कशी तर भौतिक शास्त्रावर आधारलेली, पण भारताच्या तत्त्वज्ञानाच्या प्रेरणेनें गति घेणारी अशी डॉ. केतकरांची सामाजिक विचारांच्या चळवळीबद्दलची कल्पना होती.

### संस्कृतीपेक्षां धर्म गौण

केतकरांच्या सर्व विचारांचें ध्येय 'सुधारणात्रयीं'त सामावलेलें आहे. सुधारणात्रयी म्हणजे राजकीय, सामाजिक व भाषाविषयक सुधारणा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रांताप्रांतानें स्वभाषेंतून स्वतःच्या सोयीस पडेल असें वाङ्मय तयार केल्यास, समाजांत विचारक्रांति घडवून आणण्यास मदत होईल आणि त्यामुळें समाजाचीं अंगें-उपांगें तपासून पुष्कळशा प्रघातांना निराळें वळण लावतां येईल, जातिभेदासारख्या विषमय भावनांचें संपूर्ण उच्चाटन करतां येईल, सामाजिक विचारांना वेगळी दिशा लागली कीं, सुखी कुटुंब हाच ज्या समाजाचा मूलाधार आहे असा बहुरंगी, बहुभाषी, नवा भारतीय समाज निर्माण करतां येणें अगदीं शक्य आहे, असा डॉ. केतकरांचा एकंदर सिद्धान्त आहे. भारतीय समाजाचें ज्ञानकोशांत व इतर ठिकाणीं त्यांनीं जें पृथक्करण केलें आहे त्यांत हिंदु समाजाचें जरी प्रामुख्यानें वर्णन केलें असलें तरी मुसलमान, पार्शी, ख्रिस्ती, यहुदी, जैन, इत्यादि समाजांना त्यांनीं याच समाजाचीं उपांगें म्हणून पाहिलें आहे. कारण 'धर्म' या बाबीला डॉ. केतकरांनीं संस्कृतीपेक्षां गौण लेखिलें आहे. जे जे परके या देशांत आले व स्थायिक झाले, त्यांनीं धर्म हें आपलें वैशिष्ट्य कायम राखलें तरी संस्कृतीचीं प्रमुख अंगें म्हणजे, भाषा, रिवाज व पोषाख याच देशांतल्या आपल्या शेजाऱ्यांचीं उचललीं व अलग राहूनहि ते भारतीय समाजाचे घटक बनले. पार्शी व यहुदी समाज हे अशा तऱ्हेचे समाज होत. मुसलमान व ख्रिस्ती म्हणजे तर इकडचेच बाटलेले हिंदू. तेव्हां मुळांत त्यांची संस्कृति तर खास आमचीच. तेव्हां जो कांहीं बोलबाला त्यांच्या संस्कृतीसंबंधानें होतो तो मुळांत 'राजकीय स्वरूपाचा' असून सामाजिक दृष्ट्या त्यांचें व मोठ्या हिंदु समाजाचें एकीकरण होण्यांत कांहीं धोका आहे असें डॉ. केतकरांस वाटत नसे. सीलोनमध्यें ख्रिस्ती व बौद्धधर्मी माणसें एकाच कुटुंबांत असतात. त्यांचा धर्म त्यांच्या सामाजिक दळणवळणाच्या आड कुठेंच येत नाहीं. तसेंच इथें कां होणार नाहीं? आणि म्हणूनच मालिनी-खान विवाहाची त्यांनीं तरफदारी केली. मुसलमानांच्या असहिष्णु वृत्तीचा ज्ञानकोशाच्या बाबतींत जरी त्यांना कटु अनुभव आला असला तरी त्या समाजाबद्दल दुजाभाव त्यांनीं केव्हांच दाखविलेला नाहीं. त्यांनीं शुद्धिसंघटनेला पाठिंबा दिला. तरी, त्यांत मुसलमान व ख्रिस्ती समाजांबद्दल केव्हांच कटुता दाखविली नाहीं. हिंदुसमाजाबद्दलचें त्यांचें प्रेम अपार होतें. आपला समाज होईल तितका मोठा व्हावा म्हणून शुद्धीचें तत्त्व त्यांना आवडे. पण 'माणसें चोरण्याची' मिशनरी विद्या मात्र त्यांना गर्हणीय वाटे. हीं माणसें बहुतेक अज्ञ व दलित समाजांतलींच चोरलीं जातात तेव्हां त्यांना आपल्या संस्कृतीचें यथार्थ ज्ञान करून देऊन, जातिभेदाला मूठमाती देण्यास हा शुद्ध करून घेतलेला समाज उपयुक्त होईल असें त्यांना वाटे. या बाबतींत अगदीं खालच्या लोकांना मिशनरी हुकमतीखालीं स्वच्छतेचें व टापटिपीचें बाळकडू साहजिकच जास्त मिळतें, धंद्यांतहि त्यांची प्रगति जास्त होते हें मान्य करून, डॉ. केतकर म्हणतात कीं पहिल्यानें या लोकांना बाटूं द्यावें. ते चांगले सुधारले कीं मग आपल्या संस्कृतीचें महत्त्व त्यांच्या मनावर बिंबवून त्यांना आपल्यांत ओढून घ्यावें. म्हणजे धंदे शिकविण्यास व इतर चांगल्या संवयी लावण्यास जो खर्च व दगदग पडते ती आयती वांचेल. विधर्मी जोडप्यांत दोन्ही तऱ्हांनीं लग्नाचे विधि करावे.

## समाजशास्त्राचें ध्येय : दलितसंरक्षण

डॉ. केतकरांचें बहुतेक लेखन समाजशास्त्रीय आहे. त्याचा मुख्य आशय हाच आहे. या लेखनाचे दोन स्थूल भाग पडतात. पहिला वर्णनात्मक भाग. यांत त्यांच्या जातिसंस्थेचें विवरण त्यांचे हिंदू जातींवरचे इंग्रजी प्रबंध, ज्ञानकोशांतला प्रस्तावनेंतील बराचसा भाग, आणि 'भारतीय समाजशास्त्र' या पुस्तकाची सतरापासूनचीं प्रकरणें —यांचा मुख्यतः समावेश होतो. हें वर्णन केवळ शुष्क तपशील म्हणून त्यांनीं तयार केलेलें नाहीं, तर त्यामागें वर सांगितलेल्या नवसमाजाच्या निर्मितीसाठीं चिकित्सेनें सर्व प्रकारची माहिती त्यांनीं बारकाव्यानें मांडली आहे. भावनावशतेचें सूक्ष्म वातावरण त्यांच्या या लिखाणांत भरलेलें आहे. आणि स्वीं... रिस्लेच्या पावलांवर पाऊल टाकून चाल... अ... म... 'विद्यापीठी' समाजशास्त्रज्ञांना त्यांचें ...द्धावि... विसकळलेलें वाटलें. म्हणूनच सिद्धान्तांच्या प्र... ...न त्यांचें हें वाङ्मय तपासूनच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# डॉ. केतकरांचा समाजशास्त्रविषयक दृष्टिकोन

भारतीय समाजशास्त्रावरील वाङ्मयांतलें त्यांचें स्थान ठरवावें लागेल.

डॉ. केतकर हे तर्ककर्कश विद्वान् नसून मिल-स्पेन्सरप्रमाणेंच ओल्या अंतःकरणाचे समाजशास्त्रज्ञ होते याची ग्वाही त्यांचें कादंबरीवाङ्मय देतें. या वाङ्मयांत ठिकठिकाणीं त्यांनीं समाजशास्त्राचें ध्येय वर्णन केलें आहे. ज्ञानाकरितां हें ज्ञान नाहीं; मानापमानाकरितां तर मुळींच नाहीं. समाजशास्त्राचें ध्येय दलितांचें सरंक्षण असें आहे. जो पडला असेल त्याच्यावर रट्टे चढवावे, असें जें जगाचें धोरण आहे त्याचा निषेध करणें, हें समाजशास्त्राच्या अभ्यासाचें पहिलें गमक आहे असें ते म्हणत. गुन्ह्याच्या मागें पापापेक्षां दुर्दैवाचा भाग जास्ती असतो अशी त्यांची पहिल्यापासून शेवटपर्यंत श्रद्धा होती. ही श्रद्धा अनुभवानें, खोल समाजनिरीक्षणानें बळावत गेलेली त्यांच्या लेखनांत आपल्याला आढळून येते. कौटुंबिक जिव्हाळ्याचा अभाव, आर्थिक कुचंबणा. आणि जगाच्या संसारांत गुलाम राष्ट्राला येणारें गौणत्व यांमुळें आपल्या समाजाचें जीवन खुरटें झाल्याचें त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतून दाखविलें आहे. पण हें गाऱ्हाण्यांच्या शब्दांत न मांडतां त्यांनीं विवेचक बुद्धीनें मांडलेलें आहे. हीं समाजदृश्यें दाखवितांना भविष्यकाळाबद्दल त्यांनीं कमालीचा आशावाद दाखविलेला आहे. त्यांचें समाजाच्या घडामोडींबद्दलचें सर्वच लिखाण भविष्याच्या निदानांनीं भरलेलें आहे. त्यांतलीं कांहीं निदानें आज चूक ठरलीं तरी पण त्यांचें सर्वांत मोठें निदान, ‘एक जगांत भारताचें स्थान’, हें उत्तरोत्तर साकार होत चाललें आहे.

### सर्व संस्कृतींचें ऐक्य करण्याची शक्ति

डॉ. केतकरांच्या समाजशास्त्रीय लिखाणाचा जो सर्वांत महत्त्वाचा, पण अत्यंत थोडा आहे असा भाग म्हणजे, समाजशास्त्राचा सिद्धान्तरूप आढावा. मागच्या भागाचें मुख्य स्वरूप म्हणजे समाजशास्त्रीय सिद्धान्तांच्या आधारें केलेली समाजाच्या निरनिराळ्या अवस्थांची पाहणी. पण या दुसऱ्या भागांत खुद्द समाजशास्त्राचाच सिद्धान्तांची पायाशुद्ध तपासणी केलेली आहे. कॉण्टे, स्पेन्सरसारख्या पाश्चात्य समाजशास्त्रज्ञांच्या सिद्धान्तांची छाननी करून केतकरांनीं दाखविलें कीं पाश्चात्यांचें समाजशास्त्र अपूर्ण असल्यामुळें भारतीयांस मार्गदर्शक होऊं शकणार नाहीं. आमची जातिसंस्था पश्चिमेंत अस्तित्वांत नाहीं;त्यामुळें ‘राष्ट्ररूपी नवीन जात निर्माण करण्यास लागणाऱ्या शास्त्रीय ज्ञानाचा युरोपांत अभाव’ आहे असें ते म्हणतात. आणि म्हणूनच जातिसंस्थेचा सांगोपांग अभ्यास हें आमच्या समाजशास्त्राचें प्रमुख अंग झालेलें आहे. या कारणास्तव अगदीं विद्यार्थिदशेंत लिहिलेला जातिसंस्थेचा इतिहास डॉ. केतकरांनीं अधिक वाढवून ‘समाजशास्त्रां’त घातला त्यामुळें तें नुसतें समाजशास्त्र न राहतां,आमचें म्हणजे भारतीयांचें समाजशास्त्र झालें. ‘भारतीय समाजशास्त्र’ हा विषय फार व्यापक आहे डॉ. केतकरांनीं त्याच्या कक्षा ओळखलेल्या आहेत. आणि म्हणून पाश्चात्य समाजशास्त्रज्ञांप्रमाणें उत्क्रांतिवादावर भर देऊन समाजाच्या वेगवेगळ्या थरांची छाननी त्यांनीं केली नाहीं. पाश्चात्य ग्रंथकार भारतीयांबद्दलच्या समाजशास्त्रीय ग्रंथांत विवाहसंस्था, धर्मसंस्था इत्यादि गोष्टी ज्या जंत्रीवजा ठरीव पद्धतीनें मांडतात ( व आमचे विद्वान् देखील तीच मांडणी व प्रमाणें अनुसरतात— ) त्या पद्धतीचा मागमूस देखील या छोट्या पुस्तकांत सांपडणार नाहीं.

भारताचें समाजशास्त्रीय वैशिष्ट्य म्हणजे आमचे स्मृतिग्रंथ. स्मृतिग्रंथ हे समग्र प्राचीन भारतीय समाजजीवनाचा आडाखा नव्हते. समाजाच्या गतिशीलतेचें नियंत्रण आणि स्थूल स्थितीचें दर्शन तेवढें या ग्रंथांत सांपडतें. पण कांहीं विद्वान् स्मृतींना सर्वव्यापक समाजशास्त्रीय विचारांचें आगर समजतात. ( उदाहरणार्थ, केवल मोटवानींचें ‘Sociology हें पुस्तक पहा. ) परंतु डॉ. केतकरांनीं स्मृतींची दखल आपल्या प्रारंभींच्या प्रबंधांत व ज्ञानकोशांत व्यवस्थित घेतली असली, तरी समाजशास्त्रावरील आपल्या पुस्तकांत त्यांनीं स्मृतींच्या विषयांचा निर्देश टाळला आहे. त्यांत त्यांची प्रयोजकता दिसून येते. ती अशी कीं समाजधारणाशास्त्र हा भारतीय समाजशास्त्राचा एक महत्त्वाचा भाग जो त्यांनीं उल्लेखिला आहे, त्याचें विवरण करतांना स्मृतींवर कांहीं प्रकरणें त्यांना लिहितां आलीं असतीं. समाजाचा इतिहास हें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तिसरें अंग देखील त्यांनीं उल्लेखून बाजूला ठेवलें. समाजशास्त्राच्या या पुस्तकांत 'समाजघटनाशास्त्र' तेवढें त्यांनीं विचारांत घेतलें आहे. कारण 'जगाला सुखी करण्यासाठीं सर्व संस्कृतींचें ऐक्य करण्याची शक्ति फक्त हिंदूंच्या हातीं आहे, इतरांच्या हातीं नाहीं असा प्रस्तुत लेखकाचा पूर्ण विश्वास' असल्यामुळें हिंदु जनतेला आपल्या कर्तव्याची जाणीव होऊन तिच्या अंगीं नवीन जोम उत्पन्न व्हावा म्हणून त्यांनीं समाजशास्त्राचा प्रचलित स्थितीला उपयुक्त तेवढाच भाग जनतेला सादर केला आहे. अर्थात् समाजशास्त्राचा एकतृतीयांश भाग तेवढा त्यांनीं पूर्ण केलेला आहे.

### भारतीय सामाजिक चळवळींचीं बीजें

डॉ. केतकरांच्या समाजशास्त्रीय विचार-
प्रणालीचें वैशिष्ट्य समजण्यास त्यांच्या आधीं
समाजशास्त्राचा या देशांतला इतिहास लक्षांत घेतला
पाहिजे. 'समाजशास्त्र' या शब्दाची उत्पत्ति व
एकंदर भारतांतली समाजशास्त्राकडे उत्तरोत्तर
कलणारी वृत्ति कशी तयार झाली हा वृत्तान्त फार
मनोरंजक व मोठा आहे. भारतीय समाजशास्त्राला
अनुकूल सामग्री पुरविण्याचें महाराष्ट्राचें कर्तृत्व मोठें
आहे. ज्या ज्या घटनांनीं देशभर सामाजिक चळ-
वळी उठल्या, त्यांचीं बीजें महाराष्ट्रांतल्याच कांहीं
दुर्दैवी घटनांनीं पेरलीं. उदाहरणार्थ, पंडिता रमाबाईचें
धर्मांतर, डॉ. रखमाबाईचा घटस्फोटाचा पहिला
खटला, संमति-बिल इत्यादि. न्यायमूर्ति रानड्यांचें
अखिल भारतीय नेतृत्व व लो. टिळकांचें राष्ट्रीय
पक्षांतलें नेतृत्व, यांचें महत्त्व आमच्या सामाजिक
इतिहासांत मोठें आहे. महाराष्ट्रांत समाजशास्त्रीय
विषयावर राजारामशास्त्री भागवतांनीं प्रथम लिहिलें.
महाराष्ट्रांतल्या जाती-उपजातींवर लिखाण करतांना
त्यांनीं, ज्याला आपण आज समाजशास्त्रज्ञ म्हणतों
त्या अर्थानें 'देशांतील सामाजिक घडामोडींचा
अभ्यास करणारा इतिहासज्ञ' असा अवघड पण
अचूक वाक्प्रयोग वापरला आहे. हा काळ १८७७
चा. त्या वेळीं स्पेन्सरचें समाजशास्त्रावरचें पुस्तक लिहिलें गेलें नव्हतें. टिळक, आगरकर व हरिभाऊ आपटे यांच्या वाङ्मयाचें परिशीलन केलें म्हणजे मिल व स्पेन्सर यांची मोहिनी या थोर लोकांच्या विचारांवर किती पडली होती हें सहज दिसून येतें.

'समाजशास्त्र' हा शब्द मात्र मराठींत पहिल्यानें १८८७ सालीं 'मनोरंजन–निबंध-चंद्रिका' या मासिकांत संमतिवयाच्या व विधवा-विवाहाच्या बिलाच्या बाबतींत मलबारी शेठवर हल्ला चढवीत असतां संपादकीय स्फुटांत हरिभाऊ आपट्यांनीं तयार करून वापरला. पुढें तो रुळला. याच सुमारास स्पेन्सर 'प्रिन्सिपल्स ऑफ सोशिऑलॉजी' हें पुस्तक प्रकरणशः मासिकांतून प्रसिद्ध करीत होता.

पुढें श्री. नारायण लक्ष्मण फडके यांनीं १९०५ व १९०६ सालीं स्पेन्सरच्या पुस्तकाचीं भाषांतरें प्रसिद्ध केलीं ('समाजशास्त्राचे मूल सिद्धान्त व समाजशास्त्राचीं तत्त्वें). इतिहासाचार्य राजवाडे यांनींहि समाजशास्त्राचा पुरस्कार याच काळापासून सुरू केला. राजवाड्यांच्या मताप्रमाणें समाजशास्त्राची कक्षा म्हणजे 'मानवेतिहास' होय. 'भारतीय समाजशास्त्र' हा शब्दप्रयोग व कल्पना डॉ. केतकरांनीं राजवाड्यांच्या भारत-इतिहास-संशोधन-मंडळाच्या पहिल्या वार्षिकोत्सवाच्या प्रसंगीं केलेल्या भाषणांतून उचललेली आहे! यानंतर गोविंद चिमणाजी भाटे यांचीं व्याख्यानें स्पेन्सरवर आधारलेलीं व आपल्या समाजांतील ठोकळ व्यंगांवर हल्ला करणारीं अशीं १९१५ मध्यें 'समाजशास्त्रावरील व्याख्यानें' या नांवानें प्रसिद्ध झालीं. त्यावर डॉ. केतकरांनींच हल्ला चढवला. त्यांनीं ज्ञानकोशांत समाजशास्त्रावर स्वतंत्र स्फुट लिहिलें व नंतर सुमारें बारा वर्षांनीं (१९३६ सालीं) त्यांचें 'भारतीय समाजशास्त्र' बाहेर पडलें.

या समाजशास्त्रज्ञाची 'ज्ञानकोशा'ची जी अवाढव्य कामगिरी, तिनें त्यांच्या मूळ आवडीच्या खऱ्या विषयाच्या–समाजशास्त्राच्या व्यासंगांत अडथळा आणला असें मला वाटतें. त्यामुळें त्यांच्या बहुमोल मौलिक लेखनाला आपण मुकलों.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. वा. मु. लिमये

# जागतिक शांततेचा प्रश्न

" To disarm appears to be an irregular verb with no first person singular and only a future tense "— M. Herriot.

" World depends upon what is in our hearts more than upon what is written in our treaties "—Byrnes.

दुसरें जागतिक युद्ध संपून फार काळ लोटलेला नाहीं. युद्धानें झालेल्या हानीची जाणीवहि अद्याप ताजीच आहे. परंतु तरीहि तिसरें महायुद्ध होणार नाहीं अशी कुणाचीच मनोमन खात्री होत नाहीं. उलट तें होणारच अशी भीति मात्र उत्कटतेनें वाटते. जागतिक युद्धानें बिघडलेल्या घडीची पुन्हां घडी कशी बसवावी हाच प्रश्न देशोदेशींच्या राज्यकर्त्यांना सतावीत आहे. युद्ध चालूं असतांना आज ज्यांना बडीं राष्ट्रें संबोधिलें जातें त्यांना मतभेद मिटाविणें अपरिहार्य होतें. समान शत्रूचा विच्छेद करावयाचा असल्यानें त्यांना मतभेद मिटवावेच लागत. आज जागतिक संघटना निर्माण झालेली असली तरी बडया राष्ट्रांनीं आपले मतभेद मिटविलेच पाहिजेत अशी निकडीची परिस्थिति निर्माण झालेली नाहीं. " मतभेदांना मूठमाती दिली नाहीं तर मतभेदच आपणाला मूठमाती देतील " असें वाटावें अशी आजची परिस्थिति नाहीं. त्यामुळें बडीं राष्ट्रें आपले पृथक् असे हितसंबंध राखण्याचा प्रयत्न करीत असून मतभेदांचें पेंव फुटत आहे. अजूनहि सर्वसंमत असे तहाचे मसुदे तयार होत नाहींत.

## कायम सदस्यराष्ट्रांची जबाबदारी

युद्धाचा अभाव म्हणजे शांतता अशी शांततेची कल्पना ( Negative Concept ) गेल्या महायुद्धापूर्वींच खलास झालेली होती. आर्थिक सामाजिक व सांस्कृतिक बाबींत राष्ट्राराष्ट्रांचें सहकार्य साधतां येईल अशी जागतिक संघटना पाहिजे हा विचार पहिल्या महायुद्धानंतर दृढमूल झाला. राजकीय बाबतींत राष्ट्राराष्ट्रांचें सहकार्य साधणें हें दुस्तर आहे असा अनुभव 'लीग ऑफ नेशन्स'च्या जमान्यांत आला होता व तोच आजहि येत आहे. आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक सहकार साधण्याच्या बाबतींत 'युनायटेड नेशन्स ऑर्गनायझेशन'नें लीगच्या पुढें एक पाऊल टाकलें आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. छोट्या राष्ट्रांच्या आक्रमक वृत्तीला पायबंद घालण्यास 'लीग'पेक्षां 'यूनो' अधिक समर्थ आहे ही गोष्टहि मान्य केली पाहिजे. कारण अद्या आक्रमक राष्ट्राविरुद्ध करावयाच्या उपाययोजनेंत सर्व सदस्यराष्ट्रांनीं भाग घेतलाच पाहिजे असा निर्णय घटनेनुसारच लीग घेऊं शकत नव्हती. यूनोच्या सुरक्षा-समिती( Security Council )-ला सर्व सदस्य राष्ट्रांच्यातर्फे आक्रमक राष्ट्रांविरुद्ध करावयाच्या उपाययोजनेचा निर्णय घेतां येईल. परंतु छोट्या राष्ट्रांची आक्रमक वृत्ति हा कांहीं जागतिक शांततेला खराखुरा धोका नव्हे.[1] बड्या राष्ट्रांच्या आक्रमणाला प्रतिकार करण्यास यूनो

---

१ प्रो. श्वार्झनबर्गरनें म्हटलें आहे :–" In the present hierarchy of powers, wars between smaller States endanger world security as little as brawls in a public-house threaten public peace. "
—*A Manual of International Law*



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असमर्थ आहे याच निर्णयास आंतरराष्ट्रीय कायद्याचे मान्यवर तज्ज्ञ पोहोंचलेले आहेत. जागतिक शांतता राखण्याची जबाबदारी सुरक्षा-समितीच्या कायम सदस्य ( Permanent Members ) असलेल्या राष्ट्रांवरच आहे हा विचार महत्त्वाचा आहे.

नव्या जागतिक संघटनेंत सर्व बड्या राष्ट्रांचा समावेश झालेला असल्यानें व युद्धकाळींच जागतिक संघटनेची सनद निर्माण झालेली असल्यानें राष्ट्रसंघापेक्षां विशेष भरीव असें शांततारक्षणाचें कार्य ही संस्था करील असें अनेकांना वाटत होतें. जागतिक संघटनेच्या सनदेची घडण होत असतांना अणुशक्तिनियंत्रणाचा प्रश्न निर्माण झाला नव्हता.[२]

आतां अणुबॉंबचें गुपित रशियाला समजलें आहे असें म्हणतात; परंतु यामुळें अणुशक्ति-नियंत्रणाचा प्रश्न सुटेल अशी परिस्थिति निर्माण झाली आहे असें मात्र नाहीं. अमेरिकेनें आतां हैड्रोजन बॉंब शोधून काढला आहे व त्याची विनाशक शक्ति फार मोठी आहे. सुमारें शंभर चौरस मैल मुलूख जीवनरहित करणें व बराच काळ टिकेल अशी प्रखर उष्णता निर्माण करून तो प्रदेश वस्तीला नालायक बनविणें ही कामगिरी हा बॉंब करूं शकेल. अणुबॉंबप्रमाणें याच्या आकारावरहि फार बंधन नाहीं. वापर करणारानें ओघानें येणारा धोका पत्करला तर १ टन वजनाचा हैड्रोजन बॉंब तयार करतां येईल असें म्हणतात. रशियाला हा बॉंब सांपडण्यापूर्वींच त्याचा फडशा पाडावा या हेतूनें अमेरिका युद्धाला प्रवृत्त होणें संभवनीय आहे. अणुबॉंबचें गुपित माहीत झालेल्या रशियाला अणुबॉंब वापरून अमेरिकेचें विलक्षण नुकसान करतां हेईल; शहरांतून केंद्रीभूत झालेली आणि उत्तुंग प्रासादांतून एकवटून रहाणारी अमेरिकेची लोकसंख्या असतांना तर जीविताची आणि वित्ताची हानि प्रचंड प्रमाणांत करतां येईल! रशियाची लोकसंख्या अफाट प्रदेशांत पसरलेली असल्यामुळें हैड्रोजन बॉंब अमेरिकेजवळ आहे या विचारानें रशिया नरम येणें संभवत नाहीं. चीन व युरोप—आशियांतील इतर कांहीं राष्ट्रें आपल्या पंखाखालीं घेऊन अमेरिकेला लढाई करणें खर्चाचें, कालावधीचें आणि जिकीरीचें करावयाचें हेंच रशियाचें आजचें धोरण दिसतें. तेव्हां वैज्ञानिक प्रगतीचा विचार करतांहि युद्धसंस्था विनाश पावेल असें मानण्यास पुरेसा आधार नाहीं.

### युद्ध करणें हा गुन्हा

जर्मनीचा पराभव झाल्यानंतर हिटलरच्या साथीदारांना शिक्षा झाली या गोष्टीचा युध्यमान राष्ट्रांच्या नेत्यांवर इष्ट परिणाम होईल असा विश्वास न्यूरेनबर्ग खटल्यानें वाढीस लावला. युद्धाला आंतरराष्ट्रीय कायद्यानें गुन्हा ठरविणें ही बाब निःसंशय क्रांतिकारक आहे. प्रत्यक्षांत मात्र या घटनेनें क्रांतिकारक फरक पडेल असें वाटत नाहीं. H. A. Smith म्हणतो : The Precedent amounts to this that the members of a government which decides to engage in war will make their decision with the full knowledge that they run the risk of being hanged at the hands of their enemies *if they do not win* "–*Free Europe*. "जर ते हरले तर" या विचारापेक्षां "जर ते विजयी झाले तर" याच विचाराचा पगडा सामर्थ्यवान् राष्ट्रांच्या नेत्यांवर बसणार हें उघड आहे. कारण 'साहसे श्रीः प्रतिवसति" या सूत्राचाच प्रभाव सामर्थ्यवान् राष्ट्रांच्या मुत्सद्द्यांवर पडावयाचा. न्यूरेम्बर्ग

---

२ अणुशक्तीच्या आंतरराष्ट्रीय नियंत्रणाचा विचार करण्याकरितां नेमलेल्या लिलिएंथाल-समितीनें आपल्या अहवालांत खालील विचार व्यक्त केले आहेत :

"The atomic bomb made it clear that the plans which had been laid down at San Fransisco for the United Nations Organization will have to be supplemented by a specific control of an instrument of war so terrible that its uncontrolled development would not only intensify the ferocity of warfare, but might directly contribute to the outbreak of war."









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खटल्यांचा दुसरा एक परिणाम म्हणजे युद्ध-गुन्ह्यांची जबाबदारी व्यक्तींवर पडेल हा होय.[३]

परंतु या मुद्द्याबद्दल देखील तज्ज्ञांत मतभेद आहेतः इंग्लंडच्या सैनिकासंबंधीं प्रो. डायसींनीं केलेल्या एका विधानाची या संदर्भात आठवण होते : "वरिष्ठांचा हुकूम न पाळला तर तो गोळीला बळी पडेल. पाळला तर न्यायालयें त्याला फांशी सुनावतील." वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या हुकुमावरून सैनिकांना कांहीं युद्धगुन्हे करावेच लागतील आणि ते केलेहि जातील. शिवाय दुसराहि एक मुद्दा महत्त्वाचा आहे आणि तो हा कीं विजयी झालेल्या राष्ट्राचे युद्धगुन्हे शिक्षेला पात्रच होणार नाहींत.

आणखीहि एक गोष्ट अशी आहे कीं ज्यामुळें युद्ध करणें हें अशा राष्ट्रांना अवघड वाटणार नाहीं. Cosmic War चा जमाना सुरू झाला कीं, गुन्हेगार राष्ट्र शोधून काढणें बिकट होईल.[४] गुन्हेगार म्हणून आपणाला शोधून काढणें दुष्कर आहे हीच गोष्ट महत्त्वाकांक्षी मनांना सुखकारक वाटेल व ही गोष्ट युद्धाला प्रेरणाहि देईल !

### छोटीं राष्ट्रें प्याद्यांसारखीं

जागतिक संघटनेमध्यें लहान राष्ट्रें संख्येनें बरींच आहेत व या राष्ट्रांना जागतिक शांततेसाठीं यशस्वी प्रयत्न करतां येतील हा विचार आपल्या देशांत प्रभावी आहे. हीं बारीक राष्ट्रें जवळ येऊं शकतील असे सामानहितसंबंध तरी कोणते आहेत याचा खुलासा मात्र आढळत नाहीं. आज जगांत जे सत्ताबाजीचें राजकारण चालूं आहे त्यांत हीं राष्ट्रें निव्वळ प्याद्यांसारखीं आहेत. आजच्या जगांत अमेरिका व रशिया हींच राष्ट्रें खऱ्याखुऱ्या अर्थानें राजकीय दृष्ट्या सार्वभौम आहेत. ज्या राजकीय निर्णयावर या दोन तटांतील पुढारी राष्ट्रांच्या मतांचा परिणाम झाला नाहीं किंवा छाप पडली नाहीं, असे निर्णय घेणें फारच थोड्या राष्ट्रांना शक्य होईल. छोटीं राष्ट्रें हीं सार्वभौम असलीं तरी त्यांचें सार्वभौमत्व केवळ औपचारिक व दिखाऊ आहे. छोटीं राष्ट्रें जागतिक शांततेच्या कामीं पुढाकार घेऊं शकतील म्हणजे काय करूं शकतील हें स्पष्ट झालें पाहिजे. लोकशाही समाजवाद मान्य असलेल्या राष्ट्रांचा एक स्वतंत्र गट हिंदुस्थाननें बनवावा अशा प्रकारची विचारसरणी आपल्याकडील कांहीं लोक प्रकट करीत असतात. त्याबरोबरच त्यांत जी खरी अडचण आहे ती ही कीं अशीं राष्ट्रेंच आज जगांत नाहींत, तीहि ते मान्य करतातच ! जें करण्यासारखी अनुकूल भौतिक परिस्थिति उपलब्ध नाहीं तें करावें असें प्रतिपादन करावयाचें आणि तें साधारण नाहीं हेंहि सांगून टाकावयाचें ह्याची कोणालाहि मौज वाटेल. मोठ्या राष्ट्रांच्या निर्णयावर छोट्या राष्ट्रांची छाप पडेल असा विश्वास उगाचच बाळगावयाचा असला तर बाळगावा. तो निराधार आहे यांत शंका नाहीं. छोटीं राष्ट्रें आपले कांहीं प्रश्न सोडविण्यासाठीं मोठ्या राष्ट्रांच्या तोंडाकडे पहात आहेत ही गोष्ट स्पष्टपणें दिसत असतांना छोट्या राष्ट्रांच्या पुढारीपणाचें भवितव्य काय आहे तें उघडच आहे.

---

३ Prof. Brierly म्हणतात : "Responsibility for our conduct in war as in peace is now placed squarely on every one of us—where it rightly belongs—and it is for the individual to refrain from committing a barbarity, at, no matter, what cost to himself."

—*International Law and Institutions*

४ प्रो. श्वार्झनबर्गर म्हणतात : Who can say whose agents have planted atomic bombs in the cloak-room of the principal towns of a State, from where rockets with atom bomb heads have been discharged or whose substrato-sphere planes have sprayed the fields of a country with sterilising substances ?"—A Manual of International Law.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## असहकार यशस्वी होईल का ?

युध्यमान राष्ट्रांतील जनतेनें आपापल्या राष्ट्रांतील सरकारांशीं युद्धाच्या कामीं असहकार केला तर युद्धें बंद होतील अशी एक विचारप्रणाली आहे. गांधीजींच्या असहकाराचा प्रयोग पोलिसी राज्या-(Police State)–मध्यें यशस्वी झाला असें गृहीत धरलें तरी जेथें शासनसंस्था विधायक (Positive State) असेल तेथें हा प्रयोग कितपत यशस्वी होईल याची हमी देतां येत नाहीं. स्पष्टपणें बोलावयाचें म्हणजे जग आकुंचित झालें असलें तरी जागतिक समाज (world community) ही अजून एक केवळ कल्पना (a mere concept) आहे. आणि आजच्या शासनसंस्थेला जें विधायक स्वरूप प्राप्त झालें आहे, त्यामुळें असा समाज निर्माण होणें अधिकच कठिण झालें आहे.[५]

असहकाराच्या प्रयोगांतून जागतिक शांतता निर्माण होण्याचा संभव कितीसा आहे याची कल्पना वरील विवेचनावरून करतां येईल.

आज जगांत एक नैतिक पेंचप्रसंग निर्माण झाला आहे असे अनेक गांधीवादी मानतात व आत्मिक बलाचा वापर करूनच तो सुटूं शकेल असें त्यांचें सांगणें आहे. बडीं राष्ट्रें जोंपर्यंत ही गोष्ट मान्य करीत नाहींत, तोंपयत युद्धाच्या विराट् आपत्तीचें नुसतें वर्णन ऐकून युध्यमान राष्ट्रांतील जनता असहकाराला प्रवृत्त होईलच अशी खात्री वाटत नाहीं. विजयामुळें होणाऱ्या फायद्यांचें जें वर्णन सरकारमार्फत दाखविलें जाईल त्याचा प्रभावहि पडल्यावांचून रहाणार नाहीं असें मानण्यास जागा आहे. महायुद्धांचें ऐतिहासिक कार्य सार्वभौम राष्ट्रांची संख्या घटविणें हें आहे असें दिसतें. आणि आज अशी अवस्था आली आहे कीं मोठें युद्ध (major war) करण्याची धमक फक्त रशिया व अमेरिका या दोन राष्ट्रांतच आहे. या दोन राष्ट्रांवरच शांतता कीं युद्ध हें ठरविण्याची जबाबदारी आहे. नैतिक बलाची आवश्यकता जागतिक विस्तारा(world scale)–वर मान्यता पावली तरी नैतिक बलाचें महत्त्व या दोन राष्ट्रांना पटत नाहीं, तोंपर्यंत सारें व्यर्थ आहे. कदाचित् तिसऱ्या महायुद्धानें एका जागतिक सत्तेला जन्म दिला तर अशा सत्तेविरुद्ध असहकाराचें साधन वापरणें शक्य होईल. कारण सबंध जगावर हुकुमत गाजवणें कितीहि समर्थ असलेल्या राष्ट्राला जमणें कठिण आहे. कदाचित् रशिया व अमेरिका या दोघांच्या स्पर्धागटांत, युद्ध दीर्घकाल लांबल्यास, फूट होईल व कांहीं राष्ट्रांत असहकाराची प्रवृत्ति निर्माण होईल. परंतु या तिसऱ्या महायुद्धांतून जग इतकें जर्जर आणि त्रस्त होऊन जाईल कीं तें कण्हत म्हणेल कीं: 'आम्हांला आतां शांतता द्या, मग ती शांतता कोठूनहि येवो—क्रेम्लिनहून कीं कॅपिटॉलहून! पण शांतता द्या!'

जागतिक शांततेची प्रस्थापना व्हावी म्हणून जग हिंदुस्थानकडे आशेनें पहात आहे, असें मानणें हा भाबडा आशावाद आहे. रशिया व अमेरिका यांच्यांत दिलजमाई घडविणें आपल्याला जमणार नाहीं असें पं. नेहरू म्हणाले, तो कांहीं विनय नव्हता; तर वास्तवतेची जाणीव असलेल्या थोर प्रज्ञावंताचे ते यथार्थ उद्गार होते. जागतिक शांततेच्या प्रस्थापनेंत इतर राष्ट्रांकडे केवळ प्रेक्षकाची भूमिका आज आलेली आहे. अप्रिय वाटलें तरी हेंच सत्य आहे.

---

५ "As compared with the liberal state of the nineteenth century, state activities have increased and expanded not only in the Socialist States, but also in communities which, in principle, uphold the doctrine of the free initiative of the individual. State planning in economic, financial, educational and cultural fields has brought about a situation in which the material and the ideological interests of a vast number of individuals have become identified with those of the state."

—प्रो. श्वाईझनबर्गर, उपरिनिर्दिष्ट पुस्तक.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. रा. चिं. श्रीखंडे

# 'सुश्लोकमानस'

[ सुप्रसिद्ध श्रीगोस्वामी तुलसीदास यांच्या 'रामचरितमानस' या लोकप्रिय ग्रंथाचा मराठी श्लोकानुवाद प्रस्तुत कवि करीत असून त्यांतील बालकाण्डाचा खण्ड लवकरच प्रकाशित होणार आहे. खाली घेतलेला सीता आणि राम यांच्या दृष्टभेटीचा प्रसंग बालकाण्डांतील आहे. यापूर्वीचे २५ श्लोक 'नवभारता' च्या ऑगस्ट १९४९ च्या अंकांत येऊन गेले आहेत. ]

सीता बघे चहुंकडे चकिताक्ष बाला। चिंतीत ते नृपकिशोर कुण्या दिशेला?
ज्या ज्या स्थलीं निरखि ते मृगशावनेत्रा। तेथें जणों उधळि ती सितपद्मपत्रां!!॥ २६

लताकुंजामार्गें तिजसि सखया दाविति तयां
सुनीला गौराभा, क्षितिपतिकुमारांसि उभयां
बघोनी त्या सीतानयन हरिखें तेथ खिळले
जणों ते त्यां ठेवे मिळत फिरुनी स्वीय पहिले ॥ २७

बघोनी श्रीरामा जनकतनयानेत्र निवले
न पातीं डोळ्यांचीं मिटति, तनुचें भान नुरलें!
अतिस्नेहें तीची द्रवलि बघतां त्या ऋजुमति
शरच्चंद्रातें कीं निरखित चकोरीच जणुं ती! २८

शहाणी ती आणी नयनपथिं रामा निजहृदीं
मिटोनी घे पातीं जणुं परत तो जाउं न कधीं
सख्यांनीं ती जेव्हां हृदयरति तीची निरखिली,
मनीं लज्जायुक्ता नच जनकजा बोलुं शकली! २९

लताकुंजांतूनी प्रकट तितुक्यामाजिं युगल
जहाले ते बंधू जणुं उभय इंदूच विमल.
रिघाले आकाशीं जलदपटलांतूनि गमती,
किती त्यांची शोभा कविवरमती ज्यांत रमती! ३०

ते दोन वीर सुषमानिधि जे असीम। नीलाब्जपीतजलजाभतनू निकाम॥
माथां विराजत मयूरमनोज्ञपिच्छें। शोभाविशेषभर ज्यांमधिं पुष्पगुच्छें॥ ३१



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

भाळीं टिळे विलसती वरि घर्मबिंदू । भूषाद्युती श्रवणिं शोभलि सौख्यसिंधू
भ्रूवालि चारु, कुरळा कचभार शीर्षीं । डोळे नवांबुजविभा धरिती विशेषीं । ३२
नासा हनू नयनसुंदर ते कपोल । तें हास्य लोल मन हेंचि जयास मोल
ती आननच्छवि मला कशि वर्णु यावी ? जीच्यापुढें मदनकोटि अगर्व व्हावी. ३३
वक्षःस्थलासि मणिहार उदंड साजे । कंबूपमान अतिरम्य गळा विराजे
त्या कामकुंजरकरोपम शक्तिलोल । रम्या विराजति भुजा उभया विशाल. ३४
" जो द्रोण, पुष्पिं भरला धरि वामहस्तीं । तो सांवळा कुमर गे ! अतिरम्यमूर्ति
हा सिंहशावकटि सुंदरशीलराशि । पीतांबरें विलसला सखि ! देख त्यासी. " ३५
पाहोनि भानुकुलभूषण त्या कुमारा । सीतासखीजनिं लपे तनुभाव सारा
एका सखी चतुर बोलली जानकीतें । हातीं तिचा कर धरोनि विनोदचित्तें ३६
" गे ! ध्यान तूं करिसि कीं अजुनी उमेचें ? । भूपालबाल तरि हा बघसी न कैचें ? । "
संकोचुनी मनिं तदां जनकात्मजा ती । खोलूनि नेत्र बघि ती पुढतीं सुमूर्ति ! ३७
देखे समोरचि तदा रघुसिंह दोघे । ती सांठवोनि सुषमा हृदयांतरीं घे
जाणोनि तें नखशिखान्त मनोज्ञ रूप । चिंतूनी तात-पण ती रुसली अमूप ! ३८
पाहूनि चिंतनपरा अतिमात्र सीते । झाल्या भयाकुल सख्या, वदणें किती तें ? ॥
" येऊं पुन्हांहि इकडेच उद्यां अशा गे " बोले सखी हंसत एक विनोदरागें. ३९
ती गूढ ऐकुनि सखीपरिहासवाणी । संकोचली जनकजा मनिं भी धरोनी ।
झाला विलंब, जननीहि भरेल रागें चित्तीं, भरोनि झणि राघवरूप ती घे । ४०
वाटे पुन्हां तिज ' अधीन पित्या अशी मी ' देखूं बघे मृगविहंगमिषेंचि रामीं
पाहे फिरूनि तरुपक्षिमृगादिकांना, न्याहाळि राम, नयनीं तिज तृप्ति हो ना ! ४१
प्रेमें मरे अधिक ती परि घेत भीति । कीं शंभुचाप किति तें जड, कष्टमूर्ति !
तो श्यामलांग हृदयीं परि सांठवोनी । ती जाउं लागलि गृहा गुणरत्नखाणी. ४२
जेव्हां बघे प्रभु, निघालि गृहासि सीता ती स्नेहसौख्य सुषमा गुणराशि मूर्ता
सत्प्रेमपूर्णमसिनें मृदृशी तिची ती तो चित्तभित्तिवरि काढित राम मूर्ति ! ४३
दुर्गालयीं फिरुनि जाइ मनोज्ञ सीता प्रार्थी उमेसि नमुनी जुडुनी स्वहस्तां
" हे अंबिके ! जयजयाजि ! गिरीन्द्रकन्ये ! हे गौरि ! ईशमुखचन्द्रचकोरि ! धन्ये ! ४४
तूं जन्मदा गजमुखासि षडाननासि, विश्वासि, तूंच जननी अति दिव्य होसी
ना आदि मध्य तुज तेविं नसोचि अंत, न स्वप्रभावगणनीं श्रुतिही समर्थ ४५
भवाची उत्पत्ति, स्थिति, लय तुझ्या हातिं गिरिजे
विमोहीसी विश्वा; स्ववश असती खेळ तव जे ।



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सतींमध्यें श्रेष्ठा अतुल पतिदेवा गुणवती
न वाग्देवीशेषां अमित गुण तूझे गणवती ! ४६
तुझी सेवा देई सकल पुरुषार्थासि वरदे !
सदा श्रीशंभूचें हृदय रमणारें तुजमधें
तुझ्या पादाब्जांची सुखद सकलांतें अपचिति ४७
म्हणोनी भक्तीनें सुरनरमुनी त्यांस जपती.

तूं जाणसी मम मनोरथ सर्व गौरि ! सर्वांतरी वससि तूं हृदयाधिकारी
मद्भाव मीं उघड नाहिं, म्हणोनि, केला" ऐसें स्तवोनि धरि ती पदिं अंबिकेला. ४८
तैं प्रेमभक्तिविनयें गिरिजा प्रसन्न होऊनि हार उरिंचा पडला गळून
तो सप्रसाद म्हणुनी शिरिं घेइ सीता हर्षें भरोनि वदली तिज विश्वमाता. ४९
"आशीर्वचा जनकजे ! मम सत्य ऐक । होईल ईप्सित तुझें परिपूर्ण देख.
श्रीनारदोक्ति शुचि सत्य सदैव सीते ! लाभेल तोच वर जो वरलासि चित्तें ! ५०
मन तव ज्यावर बसलें तो वर सहजमनोहर सांवळा
करुणासागर मिळेल सुचतुर जाणत तव गुण आगळा"
परिसुनि यापरि उमावैखरी सीता हर्षलि सख्यांसवें ५१
तुलसि म्हणे, मनिं नमुनि भवानी जाती स्वसदनिं सर्व जवें
प्रसन्नचित्ता बघुनी उमेसि ती । सीता मनीं हर्षलि, तें वदों किती ? ५२
वामांग तीचें स्फुरुं लागलें तदा । जें सूचवी मंगल मंजु संपदा !

---

**"आहे मी कोण ?"** (रमणमहर्षींचें तत्त्वज्ञान)

जेंवि विचारीं मीच मला कीं, 'आहे मी कोण ?'
विसरुनि जाई मलाच मी ! मग 'कां ?' तें जाणी न !
'विचारणें' ही विरून जाई—कुणी कुणा पुसणें ?
सरे 'कोण', 'मी', उरे एकलें 'आहे' हें म्हणणें !
आहे सत्-चित्, शुद्ध सरळ मम अनंत अस्तित्व,
'झालें', 'आहे', 'होणारहि' जें, तें हें मी तत्त्व;
सर्वच काळीं सर्व स्थलिं मम अस्तित्वाचि आहे,
सर्वच वसती माझ्यामधि, मी सर्वांमधि राहें
पोपटपंछी जणुं मी सारें उच्चारित राहीं
अजाण असुनिहि आत्म्याविषयीं ज्ञान वदत जाईं
अहंकार हा माझा ! आहे झुगारून देणें
तुझ्या कृपेनें महर्षि ! मजला परमहंस करणें !

—अ. मा. सगणे

["Who Am I ?" या श्री. एम्. डी. सगणे यांच्या कवितेचा अनुवाद; त्यांच्या "Raman Maharshi, The Mystic sage of Arunachalam" या प्रकाशनाभिमुख ग्रंथांतून.]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## मुक्तात्मा !

आज उघडिलें दार भोवतीं ये नयनीं उल्हास
सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

पाण्यावरचा तरंग चंचल—
जीवित सारें; केवळ मृगजल !
रम्य स्वप्न ! जागृतींत कळतो केवळ तो आभास.
—सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

सुखदुःखाचें उकलित कोडें
रमलें होतें मानस-वेडें !
मुक्त जाहलों ! ऋतानृताचा आतां होय निरास.
सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

गळली डोळ्यावरची झांपड
कळली आयुष्याची परवड
क्षणैक विश्रम पुरे ! चिरंतन पुढेंच दिव्य निवास.
सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

दिव्य दृष्टिला दिसतो आश्रम
प्रकाश उजळी पथ जाळित तम.
—जिथें दुतर्फा वनश्रीवरी नित्याचा मधुमास.
सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

ओझें येथिल इथें ठेविलें.
मुक्त जीव ! भवबंध गळाले
कृतकर्मांचें मधुर तिक्त वा फल; मजला संन्यास
सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

'मी अवध्य मी. मी अनन्त मी !'
जीव गातसे अंतर्यामीं—
'फूल गळे, पण नव्या फळाचा त्यांतच श्वासोच्छ्वास !'
सान्तामधुनी अनन्ताकडे सुरू इथून प्रवास !

—वसंत वऱ्हाडपांडे.

## तूं कोण ?

( राग—देस : ताल—धुमाळी ]

तूं कोण असशि असला ।
सांग मजला ॥ ध्रु. ॥
पंकजशयनीं ज्या आनंदें
निद्रासुख अनुभविसी ।
त्या आनंदें ज्वालाग्नींहि
लीलानर्तन करिसी ॥ तूं कोण असशि ॥१॥

रत्नजडित कंकणें करामधिं
तुझिया मजला दिसतीं ।
भिकार चिंध्या जोडुनि कंथा
घेशी अंगावरतीं ॥ तूं कोण असशि ॥ २ ॥

दुःखाश्रूंचे पाट वाहती
तव नयनांतुनि खालीं ।
परंतु विलसे आनन्दाचें
हास्यहि तुझिया गालीं ॥ तूं कोण असशि ॥३॥

तव चरणांचें महासंभ्रमें
भूपहि चुंबन घेती ।
अकिंचनांच्या झोंपडीमधें
करिसी परि तूं वसती ॥ तूं कोण असशि ॥ ४ ॥

रविचंद्रांतें मळविल ऐसें
तेज तुझें अतिभारी ।
परि तें झांकुनि आनंदानें
फिरसी तूं अंधारीं ॥ तूं कोण असशि ॥ ५ ॥

त्रैलोक्याचा अधिराजा तूं
दीनांचा कैवारी ।
दिससी मजला कृष्ण कन्हया
गोपसखा गिरिधारी ॥ तूं कोण असशि ॥६॥

—कुवलयानन्द



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# ब्रिटिश लोकशाहीपुढील पेंचप्रसंग

ब्रिटिश लोकशाहीपुढें आज अेक अजोड असा पेंचप्रसंग अुभा आहे. त्या पेंचप्रसंगाचीं उपांगें अशीं : ( १ ) सध्यांच्या मजूर सरकारकडे पार्लमेंटमधील दुर्जय बहुमत नाहीं. केवळ ४ ते ७ सभासदांच्या डळमळीत बहुमतावर मजूर सरकारला कारभार हातीं घ्यावा लागला आहे. ( २ ) पार्लमेंटमध्यें अेखादा पराभव होतांच राजीनामा देअून विरोधी पक्षाच्या हातीं कारभार द्यावा तर विरोधी पक्षापाशीं तर अितकें नाममात्र बहुमतहि नाहीं. ( ३ ) मजूर पक्षाचें समाजवादी धोरण गतिमान् असणें आवश्यक आहे. या कारणानें वादग्रस्त मुद्दे मजूर सरकारच्या धोरणाच्या बाबतींत अुपस्थित होणें अटळ आहे. याअुलट, पुरेसें पुरोगामी धोरण मजूर सरकारनें आंखलें नाहीं तर त्याच्या अनुयायांच्या दृष्टीनें तें सरकार प्रतिगामीच ठरेल व आपल्या पक्षांतीलहि पाठिंबा मजूर सरकारला गमवावा लागेल. ( ४ ) फेरनिवडणुकीनेंहि हा पेंचप्रसंग सुटण्याचा संभव कमी आहे. फेरनिवडणुकी झाल्या तरीहि पुन्हां मजूर व हुजूर हे दोनहि पक्ष अशेच तुल्यबल राहतील असें वाटतें. ब्रिटिश लोकशाहीपुढील पेंचप्रसंगाचें स्वरूप हें असें आहे. लोकशाहींतील पेंचप्रसंग हातीं सत्ता आल्यानंतर हुकुमशाहीच्या मार्गानें सोडविण्याचा मोह अनेक राष्ट्रांतील अनेक राजकीय पक्षांना आजवर झालेला आहे. ' समाजवाद हवा कीं नको !' असा महत्त्वाचा मूलभूत प्रश्न वादग्रस्त झाला असतांनाहि हुकुमशाही मार्गाची कल्पनाहि कोणाच्या मनांत येत नाहीं हेंच अेक ग्रेट ब्रिटनमधील दृढमूल लोकशाहीचें पुरेसें गमक आहे असें मानावयास हरकत नाहीं. याच पेंचप्रसंगाचें स्वरूप कांहींसें सविस्तर दाखवावें अितकाच या लेखाचा हेतु आहे.

फारसें मताधिक्य नसतांना राजकीय पक्ष अधिकारारूढ राहिल्याचीं अुदाहरणें गेल्या शंभर वर्षांच्या ब्रिटिश अितिहासांतूनहि काढून दाखवितां येतील. १८५२ मध्यें हुजूर पक्षाचें मताधिक्य फक्त २० सभासदांचें होतें. परंतु तो पक्ष चार वर्षांहून अधिक काळ अधिकारावर राहूं शकला. १९१० मध्यें हुजूर पक्षापेक्षां प्रागतिक ( Liberal ) पक्षाचे अवघे दोनच अधिक अुमेदवार पार्लमेंटमध्यें होते. परंतु ४० मजूर व ८२ आयरिश राष्ट्रवादी सभासदांच्या मदतीनें प्रागतिक पक्षाला १२४ सभासदांचें मताधिक्य मिळवितां आलें. १९२४ मध्यें मजूर पक्ष बहुसंख्य नसतांनाहि प्रागतिक पक्षाच्या मदतीनें अधिकारावर येअूं शकला. तेंच पहिलें मजूर सरकार होय. १९२९ मध्येंहि पुन्हां केवळ २९ सभासदांच्या मताधिक्यानें मजूर पक्षाला अडीच वर्षें राज्यसूत्रें आपल्या हातीं ठेवतां आलीं.

या अितिहासाची पुनरावृत्ति मात्र आज होअूं शकणार नाहीं. अेकोणिसाव्या शतकांत प्रागतिक व हुजूर या दोन पक्षांत सत्तास्पर्धा सुरू होती; परंतु त्या वेळीं अेकूण परिस्थिति कांहींशी वेगळी होती. आज राजकीय पक्षांची अंतर्गत संघटना ही अधिक दृढ व शिस्तबद्ध अशी आहे. निवडून आलेल्या राजकीय पक्षांच्या संख्याबलांत फारसा फरक पडण्याची आशा अलीकडे जवळजवळ नसतेच. प्रत्येक सभासद आपापल्या पक्षाला शिस्तीच्या नियमांनीं बांधलेला असतो. गेल्या शतकाच्या कालांत सभासदांचें व्यक्तिमत्त्व त्यांच्या राजकीय



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पक्षांत अितर्के विलीन झालेलें नसे. पक्षसंघटना पुढें पुढें अधिक बळकट झाली, परंतु तरीहि कमी-अधिक महत्त्वाचे परंतु अगदींच अुपेक्षणीय नव्हेत असे दोनांहून अधिक पक्ष पार्लमेंटमध्यें अुपस्थित असल्यामुळें निरनिराळ्या पक्षांच्या मिळणी-जुळणीनें अेकाच पार्लमेंटच्या कारकीर्दींतहि विरोधी पक्षाला आपलें बहुमत करून घेअून कारभार हातीं घेणें शक्य होअी. केवळ दोनच जवळजवळ समबल असे पक्ष पार्लमेंटमध्यें अस्तित्वांत असल्याचें अुदाहरण हें या निवडणुकीच्या वेळचें पहिलेंच होय. प्रागतिक पक्षाला ९ जागा मिळाल्या आहेत ही गोष्ट खरी; परंतु ६२५ सभासदांच्या सभागृहांत ही संख्या अगदींच अुपेक्षणीय होय. प्रागतिकांच्या मदतीनें मजूर सरकारला आपलें आसन अधिक बळकट करतां येअील, किंवा हुजूर पक्षाला प्रागतिकांच्या मदतीनें सरकारचा पराभव करणें अधिक सोपें जाअील; परंतु प्रागतिक पक्ष अशा विलीनीकरणाला अुत्सुक नाहीं व या नवरत्नांची आराधना करावयास मजूर–हुजूर या दोन बलाढ्य पक्षांपैकीं कोणाचीच तयारी नाहीं. यामुळें समबल हुजूर-मजुरांमधील लढा असेंच या पार्लमेंटमधील कामकाजाचें स्वरूप नेहमीं राहणार.

प्रागतिक पक्ष हा आज अेक सर्वांच्या अुपहासाचा विषय होअून बसलेला आहे. निवडणुकींत भाग घेअून अेकूण निवडणुकीचा विचका करून टाकल्याचा आरोप त्याच्यावर करण्यांत येतो. प्रागतिक पक्षाची सद्दी संपली असून त्यानें राजकारणांतून निवृत्त होअून हुजूर–मजुरांना निकाली कुस्तीसाठीं आखाडा मोकळा करून द्यावा असा सार्वत्रिक विचारसरणीचा सूर आहे. प्रागतिक पक्ष कांहींसा दुर्दैवी खराच. पंचवीस लक्षांहून अधिक अेकूण मतें मिळूनहि त्या पक्षाला आपल्या ४७३ अुमेदवारांपैकीं अवघे ९ अुमेदवारच निवडून आणतां आले. ३१४ अुमेदवारांची तर अनामत रक्कमहि जप्त झाली. मजूर व हुजूर पक्षांच्या बाबतींत सुमारें ४०,००० मतांना अेक सभासद असें प्रमाण पडलें तर प्रागतिक पक्षाच्या बाबतींत मात्र हेंच प्रमाण २,३०,००० मतांस अेक सभासद असें आहे. राष्ट्रांत प्रागतिक मताच्या लोकांची संख्या अेकूण अुपेक्षणीय नसली तरी ते सर्वत्र विखुरेलले असल्यानें कोणत्याहि अेका विभागांत त्यांचें मतदान प्रभावी होअूं शकत नाहीं हें याचें कारण आहे.

अेकूण मतदानाच्या प्रमाणांत सभासदांची संख्या असावी हें अगदीं कांटेकोर लोकशाहीचे दृष्टीनें युक्त होय. पहिल्या महायुद्धानंतरच्या जर्मन प्रजासत्ताक राज्यानें ही पद्धत अनुसरिली होती. ब्रिटनमध्यें मात्र ही पद्धत स्वीकारली जाअील हें असंभवनीय आहे. मजूर व हुजूर हे दोनहि पक्ष या पद्धतीविषयीं अुत्सुक नाहींत. सध्याच्या पद्धतीमुळें पन्नास टक्क्यांहून कमी मतें मिळूनहि हुकमी बहुमत मिळवितां येतें. १९४५ च्या निवडणुकींत अेकूण मतदानापैकीं शेंकडा ४८·५ अितकींच मतें मिळूनहि मजूर पक्षाला पार्लमेंटमध्यें सुमारें १४० चें मताधिक्य मिळालें. या खेपेलाहि मजूर पक्षाला शेंकडा ४६ अितकींच मतें मिळालीं आहेत. हुजूर पक्ष आज खालीं असला तरी आज ना अुद्यां आपलाहि असाच लग्गा साधेल अशी आशा करावयाला त्याला जागा आहे. अशा स्थितींत अल्पसंख्याकांच्या आग्रहाकडे कोण लक्ष देईल ? प्रागतिक पक्षाला तर तितकासा वाजवी आग्रह धरणेंहि कठिण आहे. आपल्या सामर्थ्याच्या काळांत १९२२ पर्यंत प्रागतिक पक्षानेंहि ‘ मतदानाच्या प्रमाणांत प्रतिनिधित्व ’ या योजनेला विरोधच केला होता. ‘ तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ? ’ असा प्रश्न कोणी आतां प्रागतिक पक्षाला विचारला तर त्यांत चूक तें काय ?

प्रागतिक पक्षाच्या या अशा असहाय दुर्बलतेमुळें आज मजूर व हुजूर हे दोनच प्रबल पक्ष ब्रिटिश राजकारणांत प्रभावी आहेत. ( अितर सर्व लहानसहान पक्षांचा गेल्या निवडणुकींत सरसहा लोप झाला. ) या दोन विरोधी पक्षांतील तुल्य सामर्थ्यामुळेंच आज ब्रिटिश लोकशाही पेंचप्रसंगांत सांपडली आहे.

फेरनिवडणुकीनें या पेंचप्रसंगांतून सुटका होअील असेंहि नाहीं. फेरनिवडणुकीनें अेखाद्या पक्षाला निर्णायक बहुमत मिळण्यासारखें असेल तरच फेरनिव-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डणुकीचा अुपयोग. असा संभव आज दिसत नाहीं. याचीं कारणें अशीं :

( १ ) राष्ट्रांतील महत्त्वाच्या प्रश्नांची दोन विभागांत वर्गवारी करतां येते. अेक आंतरराष्ट्रीय प्रश्न व दुसरे अंतर्गत प्रश्न. नजीकच्या काळांत जागतिक महायुद्ध झालें तर चर्चिलच्या नेतृत्वाचा भाव पुन्हां चढेल ही गोष्ट अुघड आहे. परंतु अेकूण पक्षांच्या संख्याबलावर त्याचा फार परिणाम होअील असें वाटत नाहीं; अमेरिकेशीं सहानुभूति व रशियाशीं विरोध हें मजूर सरकारच्या राजकारणाचेंहि सूत्र आहे.

( २ ) अंतर्गत राज्यकारभारामुळें राष्ट्रीय अडचणींच्या काळांत विरोधी पक्षाचा फायदा होण्याचा संभव नेहमींच अधिक असतो. कारण सर्व अडचणींचें खापर सरकारच्या माथीं फोडण्यांत येतें; परंतु विरोधी पक्षावर मात्र मोघम आश्वासनें देण्याखेरीज अन्य कोणत्याच विधायक कार्यक्रमाची जबाबदारी नसते. ब्रिटनला आपली आर्थिक आघाडी सांवरतां आली नाहीं व अमेरिकेनें हुजूर पक्षाला अप्रत्यक्ष मदत म्हणून आपला आर्थिक साहाय्याचा हात आंखडतां घेतला तर हुजूर पक्षाचें काम थोडेसें सुकर होअील. परंतु पुढील अेक-दोन वर्षांत या कारणामुळें मतदानांत प्रचंड फरक पडेल असें वाटत नाहीं.

( ३ ) मजूर सरकारच्या कार्यक्रमामुळें मध्यमवर्गावरील करांचा बोजा जितका वाढला तितक्या प्रमाणांत सरकारकडून विनामूल्य मिळणाऱ्या सवलतींमुळें किंवा अल्पमोलांत मिळणाऱ्या सुखसोयींमुळें होणारी मध्यमवर्गीय कुटुंबांची आर्थिक बचत वाढली नाहीं. या कारणामुळें मध्यमवर्गाची बरीचशी सहानुभूति मजूर पक्षानें गमावली. याचें प्रत्यंतर लंडनच्या अुपनगर—विभागांतील निवडणुकींत आलें. १९४५ मध्यें या विभागांतून ५३ मजूर व ३४ हुजूर सभासद निवडून आलेले होते. १९५० मध्यें याच विभागांतून २८ मजूर व ६८ हुजूर सभासद निवडून आले. मध्यमवर्गाच्या मतदानावर सत्तेचा समतोलपणा यापुढें अवलंबून राहील असें सांगण्यांत येतें. परंतु पुढील निवडणुकींत मध्यमवर्गाची मजूर सरकारविषयींची अप्रीति याहून अधिक परिणामकारक होअील असें वाटत नाहीं; व मध्यमवर्गीय कांहीं जागा जातील. त्याअुलट कांहीं मजूर व किसान विभागांतील जागा थोड्याशा मतांच्या फरकानें मजूर पक्षाला या वेळीं गमवाव्या लागल्या त्या पुढील निवडणुकींत मजूर पक्ष मिळवूं शकेल असा दाट संभव आहे. अेकूण अखेर संख्याबलांत फार फरक पाडण्याचा संभव कमीच.

( ४ ) प्रागतिक पक्षाच्या धोरणामुळें पुढील निवडणुकीवर कांहीं विशेष परिणाम घडेल असेंहि दिसत नाहीं. प्रागतिक पक्ष राजकारण-संन्यास घेअील असें वाटत नाहीं. त्यानें तसा संन्यास घ्यावा असा आग्रह धरणें हेंहि खरोखर युक्त नव्हे. अेकूण मतदानापैकीं ११·९ टक्के मतदान मिळविणाऱ्या पक्षाला राजकीय अस्तित्वाचा निर्विवाद हक्क आहे. प्रागतिक विचारसरणीच्या लोकांचें महत्त्व लोकशाहींत तर विशेषच असतें. कारण सुवर्णमध्य साधूं पाहणारे हे लोकच हुकुमशाहीला जवळ असणाऱ्या आत्यन्तिक आग्रहापासून लोकशाहीला वांचवूं शकतात. प्रागतिक पक्षानें निवडणुकींतून बाजूला रहावयाचें ठरविलें तरीहि मजूर-हुजूर बलाबलांत विशेष फरक होणार नाहीं. प्रागतिक पक्ष लय पावला तर या मध्यममार्गी लोकांचीं मतें जवळजवळ सारख्याच प्रमाणांत मजूर व हुजूर या पक्षांत विभागलीं जातील असाच संभव आहे. प्रागतिक पक्षाचें मतदान या दोन पक्षांपैकीं कोणत्याहि अेका पक्षालाच विशेष अनुकूल असें झालें तरच त्या पक्षाच्या विल्याचा निवडणुकीवर कांहीं परिणाम होअूं शकेल. गेल्या निवडणुकींत प्रागतिक पक्षानें मिळविलेलें मतदान मजूर व हुजूर या पक्षांत शेंकडा ५५–४५, ६०–४०, ६५–३५ या प्रमाणांत विभागलें गेलें असतें तर मजूर पक्षाला निवडणुकींत मिळाल्या त्याहून अनुक्रमें १५, २२, ३५ अशा अधिक जागा मिळाल्या असत्या असा निष्कर्ष अभ्यासकांनीं काढला आहे.

( ५ ) निवडणुकीच्या निर्णयांत फरक पाडण्यासारख्या गोष्टींचा परिणामहि गेल्या निवडणुकींतच घडून आलेला आहे. १९४८ मध्यें मतदान-विभागांची पुनर्रचना करण्यांत आली. या पुनर्रचनेंत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

मजूर सरकार आपलें हित पहात आहे असा आक्षेप घेण्यांत आला होता. परंतु या पुनर्रचनेमुळें हुजूर पक्षालाच ३० अधिक जागा सुलभपणें मिळवितां आल्या. पोस्टानें मतदान करण्याची पद्धतहि या निवडणुकीपासून सुरू करण्यांत आली. आतां नवीन तांत्रिक बदल लवकर होण्याचा संभव नाहीं. प्रत्यक्ष मतदान करणाऱ्यांची संख्या वाढून अधिक स्पष्ट निर्णय मिळूं शकेल हेंहि अवघड दिसतें. या निवडणुकीवर सर्वांचें लक्ष केंद्रित झालेलें होतें. प्रत्येकाला तिच्या निर्णयाविषयीं अुत्सुकता वाटत होती. मतदानाच्या प्रमाणानें या वेळीं आपला अुच्चांक गांठला. दोन महायुद्धांतील मध्यन्तर कालांत हा अुच्चांक १९२४ च्या निवडणुकीचा ७६·६ टक्के असा होता. १९४५ मध्यें हें प्रमाण ७२·८ टक्के होतें. गेल्या निवडणुकींत अेकूण मतदारांच्या संख्येपैकीं ८४ टक्के मतदारांनीं आपला हक्क बजावला. याहून अधिक मतदान झाल्याची अितर राष्ट्रांतील अुदाहरणें आहेत. पण, ती हुकुमशाहींत हुकुमशहाच्या धाकानें.

ब्रिटिश निवडणुकी हा एक निखालस जुगार आहे असें विधान कांहीं वेळां करण्यांत येतें. मतदानाच्या प्रमाणांत प्रातिनिधित्व मिळेल असें निश्चितपणें कोणालाच सांगतां येत नाहीं. अल्पसंख्य मतदान होअून बहुसंख्य जागा मिळाल्याची उदाहरणें ब्रिटिश निवडणुकीच्या अितिहासांत अनेकदां आढळतात. याच जुगाराचा फांसा मजूर-हुजूर यापैकीं अेखाद्या पक्षाला अनुकूल पडला तर पुढील निवडणुकींत त्या पक्षाला निर्णायक बहुमत मिळेलहि. कुणी सांगावें ? परंतु राष्ट्राचा अेका विशिष्ट कार्यक्रमाला स्पष्ट पाठिंबा दर्शविणारा फरक मजूर-हुजूर पक्षांना मिळणाऱ्या मतसंख्येंत पुढील निवडणुकींत पडेल असें मात्र दिसत नाहीं.

ब्रिटिश लोकशाहीपुढील या पेंचप्रसंगामुळें मजूर सरकारपुढील पेंचप्रसंग अधिकच बिकट झालेला आहे. निवडणुकींच्या निर्णयानंतर मजूर पक्षापुढें तीन मार्ग मोकळे होते : ( १ ) फेरनिवडणुकी घेणें; ( २ ) मजूर-हुजूर संमिश्र सरकार स्थापन करणें; ( ३ ) कारभार हातीं घेअून जुळेल त्याप्रमाणें पुढील धोरण आंखणें. यांपैकीं पहिल्या मार्गातील अडचणी वर स्पष्ट झालेल्याच आहेत. फेरनिवडणुकी घेअून जनतेचा स्पष्ट कौल अेका बाजूनेंच येअील अशी आशा नसतांना फेरनिवडणुकी घेणें निरर्थक होतें. दुसऱ्या मार्गात अनेक अडचणी आहेत. जागतिक महायुद्धासारख्या राष्ट्रसंकटाच्या काळाखेरीज अितर वेळीं परस्परांशीं सहकार्य सुलभ व्हावें असे मजूर व हुजूर पक्षांचे कार्यक्रम व कार्यकर्ते नाहींत. विरोधी भावना मनांत मुरलेल्या आहेत. वैयक्तिक मानापमानहि संमिश्र सरकार स्थापन करण्याच्या आड येतील. कोणत्याहि मंत्रिमंडळांत दुय्यम स्थानाची कल्पनाहि चार्चिलला सहन होणें शक्य नाहीं. अग्रस्थान चार्चिलला द्यावयास मजूरपक्ष कबूल होअील हेंहि अशक्य आहे. आपल्या वाढत्या वयोमानाकडे लक्ष देअून चार्चिल पुढील निवडणुकीसाठीं आणखी पांच वर्षें थांबावयास तयार होणार नाहीं असेंच अनेकांना वाटतें.

मजूर-पक्षानें यामुळें तिसरा मार्ग अनुसरण्याचें ठरविलें. परंतु या मार्गाचेहि तीन वेगळे पर्याय होते : ( १ ) कोणताहि पराभव हा अविश्वास-निदर्शक समजून राजीनामा द्यावा काय ? ( २ ) केवळ चालढकल पद्धतीनें, वादग्रस्त प्रश्न उपस्थित न करतां, राज्यकारभार चालूं ठेवावा काय ? ( ३ ) समाजवादी कार्यक्रम कोणता व किती प्रमाणांत अंमलांत आणावा ? या तीन प्रश्नांपैकीं पहिल्याचें अुत्तर मजूर सरकारनें स्पष्टपणें 'नाहीं' असेंच दिलें आहे. कोणताहि पराभव अविश्वास-निदर्शक मानणें हें खेळीमेळीच्या राजकारणांत ठीक आहे. परंतु आजच्या परिस्थितींत अशा राजीनाम्यापासून निरर्थक फेरनिवडणुकीवांचून अन्य कोणताहि फायदा होण्यासारखा नाहीं. दुसऱ्या प्रश्नाचें होकारार्थी अुत्तर देण्याचा मोह अधिकार हातीं ठेवूं पाहणाऱ्या, अडचणींत सांपडलेल्या, कोणत्याहि सरकारला होणें साहजिक आहे. मजूर सरकार हाच मार्ग सध्यां आक्रमीत आहे असाहि देखावा दिसतो. महत्त्वाचे वादग्रस्त मुद्दे अजून मजूर सरकारनें अुपस्थित केलेले नाहींत. नवीन वादग्रस्त मुद्दे अुपस्थित करण्याचा अेक मोठा मोका म्हणजे राष्ट्राचें अन्दाजपत्रक सादर करण्याची वेळ. मजूर सरकारनें जवळ जवळ 'जैसे थे' स्वरूपाचेंच अंदाजपत्रक सादर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

केलें आहे. कमी अुत्पन्नाच्या गटावरील प्राप्तिकर कमी करणें व व्यापारी वाहतूक करणाऱ्या मोटारींवरील व पेट्रोलवरील कर वाढविणें याच तेवढ्या नवीन अशा गोष्टी अंदाजपत्रकांत अंतर्भूत करण्यांत आल्या आहेत. या करांवरील चर्चेत हुजूर पक्षाच्या कडव्या विरोधावर मजूर सरकारनें विजय मिळविला. परंतु तोहि केवळ अेका हाताच्या बोटावर मोजण्याअितक्या मतांनींच. अंदाजपत्रकानंतर कांहीं काळ वादग्रस्त प्रश्न पुढें ढकलतां येतील. परंतु तरीहि ते कायमचे बाजूला टाकतां येणार नाहींत. पोलादाच्या राष्ट्रीयीकरणाविषयींच्या आपल्या निश्चित धोरणाचा निर्णय १ आक्टोबरच्या आंत मजूर सरकारला घ्यावयासच हवा. आर्थिक नियोजननियंत्रणांचे अनेक फायदे पुन्हां चर्चेसाठीं पार्लमेंटपुढें आणावे लागतील त्या वेळीहि विरोधाचें वादळ अुठेल. तें टाळावयाचें म्हटलें तर पूर्वीचें धोरणच सोडून देणें आवश्यक होअील.

समाजवादी कार्यक्रम आंखून तो पार पाडण्यांत मजूर सरकार कितपत यशस्वी होतें हाच महत्त्वाचा प्रश्न आहे. अुद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण, राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेचें नियोजन, व संपत्ति–सुखसोयींचें अधिकाधिक समविभाजन हीं मजूर सरकारच्या १९४९–५० या कारकीर्दींतील कार्यक्रमाचीं मुख्य सूत्रें होतीं. अंदाजपत्रकाच्या पुरस्कारांत लोकशाही व नियोजन यांचा सुरेख संगम घडवून आणण्याची आपली मनीषा असल्याचें क्रिप्सनीं सांगितलें आहे. जेथें प्रत्येकाला अुत्कर्षाची समान संधि असेल व गरीब–श्रीमंत असे फार मोठे भेद असणार नाहींत असें नंदनवन ग्रेट ब्रिटनमध्यें अुभविण्याचा मजूर सरकारचा कृतनिश्चय त्यांनीं पुन्हां अुद्घोषित केला. या अंदाजपत्रकांतील अेकूण ३९० कोटी पौंड खर्चाच्या रकमेंतील १८० कोटी पौंड सार्वजनिक सुखसोयींसाठीं खर्च व्हावयाचे आहेत. हुजूर पक्षाचा या सर्व गोष्टींना विरोध आहेच. राष्ट्रीयीकरण व नियोजन यांमुळें व्यवस्थेंत घोटाळा निर्माण होत आहे व उत्पन्नांत घट येत चालली आहे असा त्यांचा दावा आहे. मजुरांना अधिकाधिक सुखसोयी पुरविण्याच्या प्रयत्नांत मजूर सरकारनें न पेलणारा खर्च राष्ट्रावर लादला आहे असा त्यांचा आक्षेप आहे. या सर्वांतून मजूरांचेंहि हित अखेर साधलें न जातां सर्व अर्थव्यवस्थाच कोलमडून पडेल असा युक्तिवादहि हुजूर पक्ष करीत असतो. मजूर सरकारला प्रतिदिनीं या विरोधाला तोंड द्यावयास हवे.

याहूनहि अधिक बिकट काम स्वपक्षीय टीकाकारांना अुत्तर देण्याचें आहे. ‘ पुढचें पाअूल ’ अुचलण्याविषयीं अर्थातच सरकारवर दडपण येअील. हुजूरपक्षीयांना ‘ जैसे थे ’ कार्यक्रम आंखून स्वस्थ राहणें सोपें असतें; परंतु समाजवादी ध्येय बाळगणाऱ्या सरकारला निष्क्रिय तटस्थवृत्तीनें राहणें अशक्य आहे. पूर्वीची घडी बदलण्यासाठींच तर समाजवादी सरकारचा जन्म असतो. संपूर्ण समाजवाद स्थापन होअीपर्यंत केव्हांहि गतिशून्य धोरण आंखणें म्हणजे समाजवादी सरकारनें विरोधी शक्तीपुढें शरणागति पत्करण्यासारखेंच आहे. मजूर सरकारचे अनुयायीहि त्या सरकारला तसें धोरण अवलंबूं देणार नाहींत. मजूर सरकारनें वेतनवाढीवर व संपांवर घातलेल्या नियंत्रणाविरुद्ध आतांपासूनच चळवळ सुरू झालेली आहे. सरकार क्रियाशून्य होत आहे असें वाटल्यास या चळवळीचा जोर अुत्तरोत्तर वाढतच जाअील. मजूर पक्षांतच अुजवे गट व डावे गट असे भेद पडतील व त्या परिस्थितींत मात्र हुजूरपक्षाचें साधेल. निश्चितपणें काय घडेल हें आज सांगतां येणें अशक्य आहे. आंतरराष्ट्रीय राजकारण, अमेरिकेचें ब्रिटनविषयक धोरण, आर्थिक दुरवस्थेंतून पार पडण्यासाठीं ब्रिटननें योजिलेल्या अवमूल्यनादि अुपायांचीं यशस्विता, यांवर ब्रिटनची आर्थिक सुस्थिति अवलंबून राहील. आर्थिक अनवस्था टाळतां आली व हुजूर पक्षाच्या विरोधाला व स्वपक्षीयांच्या हट्टाग्रहाला हुलकावीत पुरेसें प्रगतिपर धोरण आंखतां आलें तरच सध्यांचें मजूर सरकार यशस्वी झालें असें म्हणतां येअील. या दोन्हीहि अटी अवघड आहेत. त्या पूर्ण करण्यांतच मजूरपक्षाच्या पुढाऱ्यांच्या नेतृत्वगुणांची व कर्तृत्वाची खरी कसोटी आहे.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

श्री. ह. कृ. मोहनी

# विधायक कार्यकर्त्यांचें मार्गक्रमण

हिंदुस्थानचें राजकारण गेलीं तीस वर्षें महात्मा-गांधीजींच्या अद्वितीय व असाधारण व्यक्तिमत्त्वानें भारलेलें आहे. राजकारणाचा जो एकसारखा अखंड प्रवाह जगतामध्यें शतकानुशतकें चालूं आहे त्याहून महात्माजींचें हें राजकारण निराळें व अपूर्व आहे. आणि म्हणून महात्मा गांधीजींच्या राजकारणाबद्दल दोन भिन्न विचारप्रवाह सगळीकडे चालूं आहेत. ह्या राजकारणास विरोध करणारे लोक भारतांत आहेत, त्याप्रमाणें ह्या राजकारणास उचलून धरणारेहि असंख्य लोक हिंदुस्थानांत विद्यमान आहेत.

गेल्या तीस वर्षांतील राजकारण बहुतांशीं व्यक्तिनिष्ठ असल्यामुळें आणि हिंदुस्थानांतील राजकारणाचें स्वरूप जागतिक राजकारणापेक्षां अत्यंत भिन्न आणि अहिंसक बनल्यामुळें आजच्या राजकारणांतील मूलग्राही बदल आणि स्वराज्यस्थापनेचें रहस्य उथळपणानें वरवर विचार करणाऱ्या सामान्य मनुष्याच्या पूर्णपणानें लक्षांत येत नसल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. अहिंसक राजकारणाचा दुवा किंवा संगति अहिंसक राजकारण करणाऱ्या कॉंग्रेसच्या राज्यसंस्थेशीं कशी जोडावयाची ही कांहीं घटित अशी बाब नाहीं. हा राजकारणाचा रुळलेला रस्ता नाहीं. हें राज्यशास्त्र अगदीं नवीन आहे. ह्या शास्त्रास पूर्वानुभवाचा पाठिंबा नाहीं.

आपली राज्यसंस्था बिकट, गुंतागुंतीच्या संकटमय अशा लष्करी, आर्थिक, आणि परराष्ट्रीय परिस्थितीच्या प्रतिक्रियेमधून आपला मार्ग आक्रमण करीत आहे. कोणत्याहि राज्यसंस्थेस पायाभूत असणारी शांतता व सुव्यवस्था देखील देशांत स्थापन झालेली नाहीं. अन्नधान्यसमस्या, शरणार्थी लोकांची विपत्ति, संस्थानांच्या विलीनीकरणाचा प्रश्न, काश्मीरचें युद्ध आणि पाकिस्तानचा व हिंदुस्थानचा संघर्ष हे प्रश्न कोणत्याहि नवीन स्थापन झालेल्या राज्यास भयंकर घोटाळ्यांत पाडणारे आहेत यांत कांहीं शंका नाहीं. कॉंग्रेस–संस्थेकडून राज्यसंस्थेची उभारणी झालेली असली तरी अशा संकटमय राजकीय परिस्थितींत आपल्या संस्थेची उज्ज्वल परंपरा कायम ठेवून ध्येयवादाच्या दृष्टीनें तिच्यांत वाढ करणें हें अत्यंत दुष्कर असें कार्य आहे. कॉंग्रेससंस्थेबद्दल आणि अहिंसक राजकारणांत अनेक वर्षें मुरलेल्या राज्याधिकाऱ्यांबद्दल जनतेमधील अनेक सुशिक्षित म्हणविणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांतील पूर्वीचा परंपरागत विरोध कायम किंवा वाढीस लागलेला; कॉंग्रेसविरोधी पक्षविशिष्ट राजकारणास पक्षस्वार्थामुळें किंवा हटवादी तत्त्वनिष्ठेमुळें ऊत आलेला; इतका कीं शांतता व सुव्यवस्था हे जे राज्यसंस्थेचें प्रथमचें पायाभूत असें कर्तव्य त्या शांततेला देखील उडवून लावण्यास पक्षाभिनिविष्ट, स्वतःस पुरोगामी व क्रांतिकारक म्हणविणारे लोक तयार; कॉंग्रेस ही जरी अवाढव्य संस्था असली तरी तिच्यामध्यें प्रक्षोभक राजकारणावरच सर्वस्वीं भर आतांपर्यंत असल्यामुळें शिस्तबाजपणा, तत्त्ववादी निष्ठा, संस्थानिष्ठ गुणसंवर्धन अशा आवश्यक, उन्नतिकारक बाबींचा देखील अभाव; अशा परिस्थितींत गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें जें राजकारणाचें पाऊल सध्यां टाकलें जात आहे तें मंद, धिमें आणि शिथिल भासलें तरी तसें तें असणें अपरिहार्यच आहे असें तटस्थपणानें व शांतपणानें विचार केल्यास आढळून येईल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# विधायक कार्यकर्त्यांचें मार्गक्रमण

गांधीजींच्या राजकारणाची अपूर्वता व तद्विषयक परंपरागत विरोध, काँग्रेसमधील परिस्थितिप्राप्त मूलग्राही बदल, आणि सद्यःकालीन राज्यसंस्थेपुढील कठिण समस्या ह्या घटनांकडे लक्ष दिल्यास ' अनुसृत्य सतां वर्त्म यत् स्वल्पमपि तत् बहु ' हें सुभाषित सद्यःस्थितींत गांधीजींच्या राजकारणाच्या प्रगतीबद्दल मनांत बाळगलेल्या अपेक्षांचें समाधान करूं शकेल असें आहे. असें असलें तरी राज्यसंस्थेच्या व काँग्रेसच्या बाहेर राहून निष्ठेनें कार्य करणारे गांधीमतानुसारी जे विधायक कार्यकर्ते आहेत, त्यांस गांधीजींचें राजकारण योग्य तऱ्हेनें प्रगत होत नाहीं ह्याबद्दल विषण्णता वाटतच आहे. राज्यसंस्थेंत सामील होऊन राज्याची धुरा वाहणारे जे थोडे तुरळक गांधीमतानुयायी राज्याधिकारी आहेत ते बिकट परिस्थितीच्या दडपणाखालीं वांकून गेलेले आहेत; आणि काँग्रेससंस्थेमध्यें राहून गांधीजींचें राजकारण जे तीव्रतेनें पुढें नेऊं पाहात आहेत असे अहिंसानिष्ठ अत्यल्पसंख्याक देशभक्त, काँग्रेसपदाधिकाऱ्यांच्या सध्यांच्या अधिकारलोलुप मनोवृत्तीमुळें आपली ध्येयनिष्ठा फारशी प्रभावी करूं शकत नाहींत. तथापि, गांधीजींची हत्या झाल्यानंतर गांधीजींच्या अनुयायांनीं सेवाग्राम, राऊ व अनगूल येथें तीन मोठीं संमेलनें भरविलीं; साक्षेपानें विचारविनिमय केला आणि आपल्या कार्याची दिशा ठरविली. काँग्रेसमधील गांधीनिष्ठ अनुयायांनीं नवीन घटना निर्माण करून गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें चालविलेल्या विधायक कार्यास महत्त्व मिळावें अशी योजना बनविली. राज्यसंस्थेंत सामील झालेल्या राज्याधिकाऱ्यांनीं वर्धाशिक्षण, मद्यपानबंदी, अस्पृश्यतानिवारण, स्त्रियांचें स्वातंत्र्य, सहकारी संस्था, आर्थिक विषमता कमी करणारे कायदेकानू, शेतकरी-कामकरी लोकांचें हक्करक्षण, ग्रामोत्थान इत्यादि अनेक साधनांनीं लोकहितकारक बाबींस प्राधान्य मिळेल अशी कसोशीनें खटपट केली. आपल्या देशांतील अहिंसात्मक राजकारणाच्या प्रगतीचे हे टप्पे आहेत. काँग्रेसराज्यसंस्था निःसंशय प्रगतिपथावर आहे. काँग्रेससारखी देशव्यापी राजकीय संस्था आपल्या उन्नतीबद्दल जागरूक नाहीं असें नाहीं. अहिंसावादी विधायक कार्यकर्ते हताश होऊन निष्क्रिय बनलेले नाहींत. तरी देखील स्वराज्यसंस्थेबद्दलच्या सामान्य मनुष्याच्या आकांक्षा सद्यःस्थितींत अनेक कारणांमुळें पुऱ्या होऊं शकत नाहींत हें कबूल करण्यावांचून गत्यंतर नाहीं. सामान्य जनतेच्या आपल्या उद्धाराबद्दलच्या अपेक्षा आणि राज्यसंस्थेकडून, काँग्रेससंघटनेकडून व समाजसुधारकांकडून त्या अपेक्षांची होणारी पूर्ति यांमधील अंतर कमी होत नाहीं. हें अंतर दिवसेंदिवस वाढत चाललेलें आहे. जनतेमधील असमाधान व अप्रीति ह्यास स्फोटक स्वरूप प्राप्त होईल कीं काय ही आशंका व भीति निर्माण होत आहे.

जनतेचें हें असमाधान कमी करण्यासाठीं देशव्यापी आंदोलनाची गरज आहे. हें आंदोलन नवीन आर्थिक नियोजनावरच उभें करतां येण्यासारखें आहे; कारण जनतेमधील अप्रीतीचें मुख्य कारण आर्थिकच आहे. काँग्रेस ही देशव्यापी संघटना आहे. ह्या संघटनेनें अनेक वर्षांच्या खटपटीनें नवीन इतिहास बनविलेला आहे. आर्थिक नियोजनावर आधारलेलें नवीन आंदोलन निर्माण करण्याची शक्यता व शक्ति ह्या संस्थेस जितकी आहे तितकी देशांतील इतर संस्थांस नाहीं. हें आंदोलन अहिंसामूलक असलें तरच त्यांत यश येण्याचा अधिक संभव आहे. कारण गेलीं ३० वर्षें जनतेस अहिंसात्मक आंदोलन करण्याचें थोडेंबहुत शिक्षण मिळालेलें आहे.

गांधी–विचारांवर निष्ठा ठेवणारे व संस्थांतर्गत शिस्तीचें पालन करणारे विधायक कार्यकर्ते देशांत इतर संस्थांशीं तुलना करतां अधिक आहेत. अशा विचाराच्या लोकांस सामान्यपणानें मान्य होईल अशी आर्थिक नियोजनाची रूपरेषा ह्या वर्षाच्या आरंभीं प्रसिद्ध करण्यांत आलेली आहे. ह्या आर्थिक नियोजनाच्या मागें गांधी–विचार–निष्ठ लोकांच्या संघटनेची शक्ति आणि काँग्रेसमध्यें राहून विधायक कार्य करणाऱ्या सभासदांचें सामर्थ्य खडें करतां आल्यास देशामध्यें सद्यःस्थितींत उपयोगी पडेल असें आंदोलन निर्माण करतां येण्यासारखें आहे.

उत्कल प्रांतांत अनगूल येथें नुकत्याच भरलेल्या सर्वोदय-संमेलनाचें महत्त्व अशा दृष्टीनें लक्षांत









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेण्यासारखें आहे. ह्या संमेलनांत ग्रामोद्योगमंडळ, अखिल भारतीय चरखासंघ, गोसेवा संघ, तालिमी संघ अशांसारख्या गांधी–विचाराच्या संघांमधील अनेक कार्यकर्ते एकत्र झालेले होते. ह्या संमेलनांत विधायक कार्यकर्ते, जनता व सरकार ह्यांच्याकडून ह्या विधायक गांधीनिष्ठ संस्था ज्या अपेक्षा करीत आहेत त्यांचें महत्त्वपूर्ण निवेदन करण्यांत आलें.

वास्तविक पाहूं जातां असें म्हणतां येईल कीं अशा निवेदना-( Statement )-ला महत्त्व यावयाचें तर प्रथम देशांतील गांधी-विचाराच्या विधायक कार्यकर्त्यांची एकजिनसी व बलशाली संघटना निर्माण व्हावयास पाहिजे. त्यांनीं स्वतः उच्चतर नैतिक शिस्तीचीं कडक बंधनें लावून घेतल्यास ही एकजिनसी संघटना प्रभुत्व पावेल आणि त्या संघटनेबद्दल देशांत विश्वास निर्माण होईल. गांधीजींच्या मृत्यूनंतर अशी संघटना निर्माण झाली पाहिजे अशी तीव्रता गांधी-विचाराच्या कांहीं विधायक कार्यकर्त्यांच्या अंतःकरणांत निर्माण झाली आहे. पण त्या तीव्रतेनें अद्याप समाधानकारक मूर्त स्वरूप धारण केलेलें नाहीं. हे विधायक कार्यकर्ते अशा संघटनेकडे हळूंहळूं कूच करीत आहेत हें खरें असलें, तरी देशांत अशा संघटित सामर्थ्यावर उभारलेल्या समुत्थानाबद्दल उज्ज्वल आशा निर्माण झालेली नाहीं.

गेल्या कांहीं महिन्यांत सर्वोदयी आर्थिक योजनेचा एक महत्त्वपूर्ण आराखडा गांधी-विचाराच्या कार्यकर्त्यांनीं तयार केला आहे. गांधी-विचारास कांहीं निश्चित स्वरूप जरी ह्या योजनेनें आर्थिक दृष्ट्या दिलेलें असलें तरी ही योजना व्यवहार्य करावयाची तर किती तरी दुर्लंघ्य अडचणींचे डोंगर उल्लंघावे लागतील. गांधी-विचाराच्या आर्थिक नियोजनाची सर्व शक्ति, लष्करी सामर्थ्यास समतोल करील, लष्करी सामर्थ्याच्या बदलीं ठेवितां येईल, अशा सत्याग्रही सामर्थ्यांत सामावलेली आहे. हें सत्याग्रही सामर्थ्य आज देशांत अस्तित्वांत नाहीं. गांधीजींच्या अद्वितीय व्यक्तिमत्त्वांत हें सत्याग्रही सामर्थ्य पूर्वीं एकवटलेलें होतें. आज देशांत सत्याग्रही सामर्थ्याच्या दृष्टीनें अवलोकन केल्यास एक भयानक पोकळी निर्माण झालेली आहे. ही पोकळी अंशतः भरून काढावयाची तर सत्याग्रहाची शक्ति अंगीं मुरवलेल्या विधायक कार्यकर्त्यांची एकजूट निर्माण व्हावयास पाहिजे आणि त्यांनीं विशिष्ट देशोद्धारक कार्यक्रमावर किंवा आर्थिक नियोजनावर आपली दृष्टि केंद्रित केली पाहिजे. सर्वोदयी आर्थिक नियोजनावर ही शक्ति केंद्रित करण्याचा प्रयत्न होत आहे. ही गांधी-विचाराच्या विधायक कार्यकर्त्यांच्या दृष्टीनें शुभकारक अशी घटना आहे.

विधायक कार्यकर्त्यांच्या अशा एकजिनसी नैतिक प्रगतिशील संघटनेमुळें लष्करी सामर्थ्याचा सद्यःकालीन अवास्तव गौरव ( glorification) कमी होण्याचा संभव आहे. गांधीदृष्टीनें सर्वंकष असा देशांतील व्यापार, शेतकी, सर्व प्रकारचें अर्थोत्पादन व अर्थविभाजन ह्यांचें नियोजन करावयास अशी संघटनाच उपयोगीं पडण्यासारखी आहे. देशाचें शिक्षणहि ह्या संघटनेनें आपल्या कक्षेत आणलें पाहिजे तरच पुढील पिढी गांधीवादी दृष्टिकोन पुढें ठेवून तयार होऊं शकेल.

गांधी-विचाराच्या विधायक कार्यकर्त्यांची दृढ अशी संघटना अहिंसक समाजरचनेचा किंवा सर्वोदय समाजाचा पाया आहे. ह्या संघटनेच्या वाढीवर कॉंग्रेसमध्यें जे निरलस नैष्ठिक, विधायक कार्यकर्ते सामील आहेत त्यांचाहि नैतिक उत्कर्ष अवलंबून आहे. जितक्या प्रमाणांत गांधी-विचाराच्या कार्यकर्त्यांची ही प्रगतिशील संघटना कार्यक्षम होईल, तितक्या प्रमाणांत कॉंग्रेसचाहि उन्नतिकारक असा काया-पालट होऊं शकेल. अहिंसक समाजरचनेच्या दृष्टीनें व्यवहार्य असें आर्थिक नियोजन करणें, आणि त्या आर्थिक नियोजनासाठीं जनतेची तयारी करणें ही झटपटीनें सिद्ध होणारी प्रक्रिया नाहीं. हा कालावधीचा प्रश्न आहे. विधायक कार्यकर्त्यांची सर्वोदयी आर्थिक योजना तयार झाल्याबरोबर, कॉंग्रेस-संघटनेनें देखील आर्थिक नियोजन करणारी एक समिति ताबडतोब नेमली. त्या समितीनें देशांतील मुख्य मंत्री व प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष ह्यांची एक महत्त्वपूर्ण सभा आर्थिक नियोजनासाठीं नुकतीच बोलाविली. कॉंग्रेस सरकारनेंहि कार्यक्षम अशी आर्थिक नियोजन-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# विधायक कार्यकर्त्यांचें मार्गक्रमण

समिति नेमून, विधायक कार्यकर्ते आणि प्रांतिक काँग्रेसप्रमुख यांच्या विचारांतून व्यवहार्य व लोकोपकारक असा कोणता आर्थिक प्रगतीचा मार्ग निघूं शकतो ह्याचें संशोधन चालविलेलें आहे. ह्या सर्व घडामोडींकडे गांधीविचाराच्या दृष्टीनें पाहतां विधायक कार्यकर्त्यांची दृढ अशी प्रगतिपर नैतिक संघटना हीच प्रामुख्यानें पुढें उभी राहण्यासारखी घटना आहे आणि त्या संघटनेवरच गांधी-विचाराची व आचाराची पुढील प्रगति निर्भर आहे.

अनगूलला जें संमेलन भरलें, त्या संमेलनाचा दूरपरिणामी विशेष हा आहे कीं, गांधीविचाराच्या विधायक कार्यकर्त्यांच्या अनेक निरनिराळ्या संघांचें ह्या संमेलनांत एकीकरण करण्यांत येऊन आतां ह्यापुढें एका मुखानें हे सर्व कार्यकर्ते बोलतील, त्यांचा आवाज एकाच संघटनेतर्फे ऐकूं येईल अशी खटपट येथें करण्यांत आली. सर्वोदय-समाज आणि सर्वसेवासंघ ह्या राऊ संमेलनांत निर्माण झालेल्या दोन संघटनांऐवजीं सर्वोदय-समाजाच्या केवळ विचारात्मक कार्याची आणि त्या हेतूनें केलेल्या विरळ, शिस्तविरहित, बंधनविरहित अशा संघटनेची जबाबदारी सर्वसेवासंघानेंच उचलली आहे. ज्या गोपबंधु चौधरींचें नांव उत्कलमध्यें गांधीनिष्ठतेमुळें घरोघरीं गाजलेलें आहे, त्या साधुवृत्ति गोपबंधूंनीं आतां सर्वसेवासंघाच्या चिटणिसाचें काम पत्करलेलें आहे. ह्या संमेलनांत काँग्रेस संघटनेमध्यें गांधीनिष्ठेनें कार्य करणाऱ्या, राजकारण करणाऱ्या प्रतिनिधींचाहि अंतर्भाव विधायक कार्यकर्त्यांच्या सर्वसेवासंघाच्या एकजिनसी संघटनेंत करण्यांत आला. डॉ. प्रफुल्लचंद्र घोष व श्री. शंकरराव देव हेहि सर्वसेवासंघाचे आतां प्रमुख सभासद बनले आहेत. गांधी-निष्ठेनें केलेलें राजकारण आणि विशुद्ध असें विधायक कार्य ह्यांमधील सांधा अनगूल येथें सांधण्यांत आला.

आर्थिक नियोजनाच्या द्वारेंच केवळ जनतेचें सद्यःकालीन असमाधान कमी होण्याचा संभव आहे. अनेक प्रकारच्या दुसऱ्या आर्थिक नियोजनाच्या उपपत्तींपेक्षां सर्वोदयी आर्थिक नियोजनावर हिंदुस्थानांतील गांधीनिष्ठ कार्यकर्त्यांचें एकत्रीकरण करणें सुलभ आहे. काँग्रेसमध्यें नवीन घटना निर्माण करून, गांधीजींच्या विधायक कार्यास प्राधान्य देऊन लोकसेवकसंघाचें स्थूल स्वरूप काँग्रेसला द्यावें असा प्रयत्न चालू आहे. सर्वोदयी आर्थिक नियोजनावर काँग्रेसमधील अनेकविध कार्यकर्त्यांचें सामर्थ्य प्रमुखपणानें एकवटतां आल्यास देशांतील महत्त्वाच्या शक्तींचें केंद्रीकरण होऊं शकेल.

अनगूलमध्यें गांधीनिष्ठ कार्यकर्त्यांचें एकीकरण करण्यांत आलें आहे. गांधीजींच्या अहिंसात्मक राजकारणाचा सर्व भर ग्रामीण जनतेच्या समुद्धारांत सामावलेला आहे. काँग्रेसच्या लक्षावधि अनुयायांची शक्ति अहिंसात्मक आर्थिक कार्यक्रमावर एकत्रित करतां आल्यास देशांत एक नवीन आंदोलन उत्पन्न होऊं शकेल. सत्याग्रही शक्तीचा परिणाम केव्हांहि मंगलमयच होणार. गांधी-विचाराच्या कार्यकर्त्यांच्या अहिंसात्मक संघटनेचा आरंभ हळूंहळूं पण निश्चितपणें सेवाग्राम येथें गांधीवधानंतर होऊन आतां ही शक्ति काँग्रेस-संघटनेवर आपला प्रभाव कितपत पाडते आणि देशांतील आर्थिक विषण्णता कमी करण्यासाठीं लवकरच किती प्रमाणांत कार्यान्वित होते हें अजमावण्याचा काळ लवकरच येत आहे. नाशिक येथें भरणाऱ्या काँग्रेसच्या अधिवेशनांत याची शहानिशा होणें अपरिहार्य आहे.

---

" वेलिंग्टननें असें म्हटल्याचें सांगतात कीं, वॉटर्लूची लढाई खरी जिंकली ईटनमधील शाळांच्या क्रीडांगणावर ! तद्वत् कदाचित् भावी इतिहासकार असें लिहितील कीं, हिंदुस्थान गमावला तो खरोखर इंग्लंडच्या पब्लिक स्कूल्समध्येंच ! India was lost in the public schools of England ! "

—सॉमरसेट मॉम



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# तीन काव्यसंग्रह

'आर्द्रा'—प्रा. यशवंत दत्तात्रय भावे, (प्रकाशक : अजित एजन्सी, बेळगांव, १९४९, मूल्य २ रु., पानें १–५२; प्रा. गं. ब. ग्रामोपाध्ये यांची प्रस्तावना पानें ५–२०)

'स्वेदगंगा'—विंदा करंदीकर, (प्रकाशक : प्रा. गो. वि. करंदीकर, रत्नागिरी, १९४९, मूल्य ३ रु., पानें १–१२७; प्रा. अनंत काणेकर यांची प्रस्तावना पानें १–९.)

'पहांटवारा'—वि. म. कुलकर्णी (प्रकाशक : प्रा. वि. म. कुलकर्णी, बेळगांव, १९४९, मूल्य २ रु., पानें १–७४; श्री. आत्माराम रावजी देशपांडे यांची प्रस्तावना पानें ५–११)

मराठी वाङ्मयांत अलीकडे 'नव'काव्याची निर्मिति सुरू आहे. या नव-काव्याचें कांहीं टीकाकारांनीं सहर्ष स्वागत केलें तर कांहीं टीकाकारांनीं 'हें काव्यच नव्हे' म्हणून उपहास केला. नव-काव्यावर स्तुतीचीं फुलें उधळलीं गेलीं तद्वत् त्याला प्रखर टीकेच्या आगींतूनहि होरपळून बाहेर पडावें लागलें. एक गोष्ट मात्र निश्चित कीं काव्यांतील नव्या प्रवृत्तींचें अस्तित्व मान्य केलें गेलें आहे. या प्रवृत्तींना अनुल्लेखानें मारणें शक्य होणार नाहीं. या प्रवृत्ती मराठी काव्यांत कदाचित् दीर्घकालपर्यंत स्थिर होतील, कदाचित् कालौघांत त्यांच्या विरुद्ध प्रतिक्रिया सुरू होऊन त्या लुप्तहि होतील. परंतु यापुढील मराठी कवितेवर थोड्या–फार प्रमाणांत तरी त्यांचा ठसा उमटणें अपरिहार्य आहे. नव-काव्याच्या सुरुवातीस रसिकांची स्थिति थोडीशी भांबावल्यासारखी झालेली होती. परंतु आतां त्याचें चिकित्सक दृष्टीनें परीक्षण केलें जात आहे ही स्वागतार्ह घटना आहे.

'आर्द्रा' 'स्वेदगंगा' 'पहांटवारा' या तीन काव्यसंग्रहांचें परीक्षण करण्यापूर्वी प्रथम नवकाव्यांतील मुख्य प्रवृत्ती कोणत्या हें लक्षांत घेतलें पाहिजे. आजच्या भांडवलशाही समाजरचनेमुळें समाज-जीवनांतील व व्यक्तिजीवनांतील सत्य व सौंदर्य नष्ट होत चाललेलें आहे. जीवनांत उदात्ततेपेक्षां क्षुद्रता, त्यागापेक्षां भोग यांचाच प्रत्यय अधिकाधिक येत आहे. सौंदर्यपूजक व ध्येयवादी व्यक्तींना या परिस्थितीमुळें एकप्रकारची उबग आली आहे आणि नवकाव्यांत तिचें प्रतिबिंब पडलें आहे. परिस्थितीच्या चरकांत आज लक्षावधि लोक पिळून निघत आहेत आणि कोणत्याहि तऱ्हेचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्यांच्या जवळ उरलेलें नाहीं. या असहायतेबद्दल सहानुभूति वाटण्याऐवजीं कींवच येते. मानवी जीवनांतील असहायतेची जाणीव ही नवकाव्यांत व्यक्त झाली आहे. मागच्या पिढीला जीवनांत श्रद्धा निर्माण होईल अशीं कांहीं ध्येयें होतीं. परंतु आज त्या ध्येयांची विफलताच एक-सारखी जाणवत आहे. मानव हा केवळ बुद्धिवादी नाहीं. त्याच्या जीवनाभोवतीं वासनांचे, भावनांचे पाशच कसे करकचून आवळले आहेत या जाणि-वेचा नवकाव्यांत आविष्कार होत आहे. अर्थात् यामुळें सर्व नवकवी आयुष्याला वैतागलेले आहेत असें नव्हे. अन्यायाच्या विदारक चित्रणाबरोबर नव्या आशा अंकुरित होतील अशाहि अनेक कविता आहेत. नवकाव्यांतील या प्रवृत्ती समजल्या म्हणजे त्या व्यक्त करण्याचें तंत्रहि स्वाभाविकपणें लक्षांत येतें. कल्पनेच्या यक्षसृष्टीचें चित्रण करण्यास आवश्यक असलेलें लालित्य नवकाव्यांत आढळणार नाहीं. वास्तवतेवर प्रकाशाचा झोत टाकणारी अर्थवाही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रतीकें नवकाव्यांत वापरलेलीं असतात.

नवकाव्यांतील या प्रधान प्रवृत्ती समजून घेतल्यावर काव्याचें परीक्षण करतांना कोणते निकष लावावे हेंहि निश्चित करणें आवश्यक आहे. काव्यांत जेव्हां केवळ भावनांचा आविष्कार असतो तेव्हां रसग्रहण हें कांहींसें सोपें असतें. परंतु आधुनिक काव्य हें यापेक्षां फार गुंतागुंतीचें आहे. या काव्याचें स्वरूप सामाजिक आहे. त्यांतील बैठक वैचारिक आहे आणि भावनाविष्कारासाठीं त्यांत प्रतीकांचा उपयोग केलेला आहे. अशा वेळीं सामान्य वाचकांची फसवणूक होण्याचीहि शक्यता असते. आजच्या संक्रमणकालांतील जाणिवा-नेणिवा आम्ही व्यक्त करतों आहोंत असा नवकवींचा दावा आहे. हें जें या नवकाव्यांत चित्रित करण्यांत आलें तें वास्तव आहे का, हें प्रथम पारखून पाहिलें पाहिजे. कवीचें मन हें संवेदनाक्षम असल्यामुळें त्याचें चित्रण प्रातिनिधिक स्वरूपाचेंच असणार असें गृहीत धरण्याचें कारण नाहीं. आत्मपर ( Personal ) आणि आत्मनिष्ठ ( Subjective ) यांतील फरक स्पष्ट करून घेतला पाहिजे. वैयक्तिक अनुभवानंतरचा भावनेचा उद्रेक आत्मपर काव्यांत असतो. याउलट समाजाच्या विविध जीवनाशीं तादात्म्य पावतांना आपला वैयक्तिक दृष्टिकोन उत्क्रांत होत असतो व आपलीं जीवितमूल्यें निश्चित होत असतात, आणि याचा आविष्कार आत्मनिष्ठ काव्यांत होत असतो. नवकाव्याचें मूल्यमापन करतांना भोंवतालच्या परिस्थितीशीं कवीच्या व्यक्तिमत्त्वाची खरोखरच एकरूपता झाली आहे कीं विशिष्ट परिणाम घडवून आणण्यासाठीं त्यानें शब्दांची केवळ पखरण केली आहे हें पाहिलें पाहिजे. तद्वतच या कविता म्हणजे केवळ भावनेचे क्षणिक उद्रेक आहेत कीं त्यांच्या मागें कांहीं आंतरिक संगति आहे याचाहि विचार केला पाहिजे.

काव्य वाचल्यानंतर मनाला आनंद झाला पाहिजे, व त्यासाठीं कवीनें सौंदर्यनिर्मितीच केली पाहिजे अशी अपेक्षा करणें चूक आहे. कवीच्या संवेदनाक्षम अंतःकरणांत कोणते भावनातरंग निर्माण झाले व आपल्या कवितेच्या साह्यानें त्यानें ते वाचकाच्या मनांत निर्माण केले का, हेंच केवळ टीकाकारानें पाहिलें पाहिजे. काव्य म्हणजे केवळ आत्माविष्कार नव्हे. कवीनें आपल्या प्रतिभेच्या साह्यानें जे अनुभव घेतले असतील त्यांची प्रतीति वाचकाला करून दिली पाहिजे. ही प्रतीति उत्कटतेनें व्हावी हीच फक्त टीकाकारानें अपेक्षा धरावी; त्यासाठीं कविता छंदोबद्ध असावी का मुक्तछंदांत लिहावी; तींत प्रतीकांचा उपयोग किती असावा या बाबतींत कवीला संपूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे. शब्द हे उद्दीपनें ( stimuli ) म्हणून वापरावयाचे असतात. जिवंतपणें स्फुरलेली भावना उत्कटतेनें व्यक्त करून वाचकाच्या मनांत विशिष्ट अवस्था ( mood ) निर्माण करण्यांत कवि यशस्वी झाला कीं तें काव्य श्रेष्ठ दर्जाचें मानावें.

'आर्द्रा' हा प्रा. भावे यांच्या नव-कवितांचा संग्रह आहे. "सामाजिक परिस्थिति आणि वैयक्तिक प्रेरणा यांच्या संघर्षांतून व्यक्तिमनावर उमटलेलीं क्षणचित्रें" असें या कवितांचें वर्णन प्रस्तावनेचे लेखक श्री. ग्रामोपाध्ये यांनीं केलें आहे. सामाजिक परिस्थितीचे चटके मध्यमवर्गीतील सर्वांनाच थोड्या फार प्रमाणांत बसत आहेत हें खरें आहे. परंतु या मर्यादित अनुभवावरून मनाच्या कांहीं प्रतिक्रिया होणें, आणि विशाल अनुभूतींतून, सबंध जीवनाची प्रतीति होणें यांत फरक आहे. 'आर्द्रा' मधील कविता वाचल्यानंतर कवीच्या अनुभूतीची मर्यादा वाचकाला चटकन् जाणवते. कवीनें पाश्चात्य कवींचें परिशीलन केलें असावें. टी. अस्. इलिअट, इझ्रा पाउंड इ. कवींचा लेखकाच्या मनावर प्रभाव पडल्यामुळें मराठींत त्या पद्धतीनें त्यांनीं कविता लिहिल्या आहेत असें वाटतें. नवकाव्य लिहिण्याच्या बुद्धिपुरःसर प्रयत्नामुळें प्रा. भावे यांच्या काव्यांत सहजतेपेक्षां दुर्बोधता आली आहे. इंग्रजींतील अतिवास्तववाद ( Surrealism ) व नवकाव्यांतील इतर कांहीं पंथ यांचा प्रा. भावे यांच्यावर इतका परिणाम झाला आहे कीं, ते कांहीं वेळां तर कल्पनांचीहि उसनवारी करतात. "धुकें घासतें पाठ" या कवितेंतील

"मनगवाक्षाच्या बिलोरी दारीं
घाशीत आहे जोरजोरानें



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

धुकें राठ दाट
आपली पाठ ''

या काव्यपंक्ती टी. अेस्. इलिअटच्या The Love-song of Alfred J. Prufrock या कवितेंतील

" The yellow fog that rubs its
back upon the window-panes "

या ओळीवरूनच सुचल्या आहेत हें उघड आहे.

सूचकतेमुळें काव्य हें मनोरम व हृद्य वाटतें हें खरें. परंतु एखाद्या घटनेविषयीं आपल्याला फारसें कांहीं सांगतां येत नसल्यामुळें मनांत चमकून गेलेल्या एखाद्या तरल कल्पनेचा उपयोग करावयाचा व 'ही एकच कल्पना इतकी अर्थवाही आहे कीं, अधिक कांहीं व्यक्त करण्याची आवश्यकता नाहीं' असें म्हणणें ही वंचना आहे. 'एक चित्र' ही कविता अशी वंचना करणारी आहे. कवीनें प्रतीकांचा उपयोग जरूर करावा परंतु आपल्या प्रतिभेचा त्रुटितपणा दडविण्यासाठीं गूढ कल्पनांची पखरण करणें हें कधींहि समर्थनीय ठरणार नाहीं.

कित्येकदां कवीच्या मनाची अशी अवस्था असते कीं, त्याच्या बहिर्मनांतील व अतर्मनांतील परस्परविरोधी व विसंवादी कल्पनांतील एकतानता त्याला जाणवते व या कल्पना तो भराभर व्यक्त करतो. परंतु वाचकाचें मन हें इतकें संवेदनाक्षम नसल्यामुळें त्याला या कल्पनांतील सुसंवादाचें आकलनच होत नाहीं. समुद्र खवळला म्हणजे एक लाट विरण्याच्या आंत दुसरी लाट येऊन आपटते व एक प्रकारचा कोलाहल माजतो. असाच कोलाहल कांहीं कवितांतून आहे असें वाचकाला वाटतें. 'मनगवाक्ष', 'मनपरिक्षिती' अशा अनेक कल्पना प्रा. भावे एकाच कवितेंत आणतात; त्यामुळें सामान्य वाचकाची दमछाक् होते. त्याच्या मनाच्या आलेखावर कोणतीहि प्रतिमा स्पष्ट उमटण्याच्या अगोदरच विरून जाते व दुसरी धूसर प्रतिमा तिची जागा घेते. याचा अखेर परिणाम असा होतो कीं, कांहीं अंधुक अस्पष्ट जाणीवा होण्यापलीकडे वाचकाला काव्यांतून इतर कोणतीहि रसप्रतीति होत नाहीं.

प्रा. भावे यांच्या कवितांतील कांहीं प्रतीकें मात्र फार सामर्थ्यशाली आहेत. 'विवस्त्र पांचाली' या कवितेंत विषमतेवर व अर्थाचे दास झालेल्या पुढाऱ्यांवर विदारक टीका केली आहे. संकेतपूर्ण व परंपरेच्या सामान्य जीवनबद्दल वाटणारा संताप

" आणि जवळी
उभा गुंग कवि
प्रेमें चघळीत
थंड सौंदर्याचीं तत्त्वज्ञानाचीं
हाडकें हाडकें ! "

या तीव्र शब्दांत व्यक्त केलेला आहे. 'चोयस्या' व 'चालली आहे ही आगगाडी' या कवितांतील प्रतीकें अगदीं सामान्य व निष्प्रभ आहेत. जीवनांतील सौंदर्याचें वर्णन करणाऱ्या कांहीं नितान्तरम्य कल्पना मधूनमधून विखुरल्या आहेत.

"...आठवते रेषा
हृत्पटीं माझ्या हळूं तूं कोरली
पृथ्वी आकाश जेव्हां मिळालीं "

हें मीलनाचें वर्णन, किंवा 'मनआम्राला लागलेल्या रेशमी मोहराची" कल्पना हीं फारच बहारीचीं वाटतात.

प्रस्तावनेमध्यें डॉ. ग्रामोपाध्ये यांनीं प्रा. भावे यांच्या जीवनाविषयक दृष्टिकोनाचें विश्लेषण करून त्यांच्या काव्यांत 'जीवनावरती आस्तिक्यपूर्ण श्रद्धा असणारा उत्क्रांतिवादी क्रांतिवाद आहे' असा निर्वाळा दिला आहे. काव्यसंग्रह वाचल्यानंतर कवीच्या व्यक्तिमत्त्वाचा जो ठसा वाचकाच्या मनावर उमटतो त्यांवरून कवीच्या जीवनाचें तत्त्वज्ञान कोणतें हें वाचक ठरवितो. ज्या कवीच्या ठिकाणीं द्रष्टेपण असतें त्याच्या एक दोन कवितांवरूनहि त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या उभारीची आपल्याला कल्पना येते. पण हें असामान्यत्व कवीजवळ नसेल तर त्याच्या अनेक कवितांतून कांहीं संवादी सूर निघतो का हें पाहिलें पाहिजे. या दृष्टीनेंहि 'आर्द्रा' हा काव्यसंग्रह अपुरा आहे. यांतील कांहीं कविता नैराश्यानें काळवंडून गेल्या आहेत, तर कांहीं कविता आशावादित्वाच्या दीप्तीनें उजळल्या आहेत. पण या सर्व क्षणसंवेदनाच आहेत असें वाटतें. त्या साऱ्यांतून 'जीवनदायी आर्द्रेचा वर्षाव होईल' असें वाटत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

नाहीं. अर्थात् कवीचें व्यक्तिमत्त्वच हें स्थिर नसून उत्क्रांत होत असतें. त्यामुळें या संग्रहांत जीवन-विषयक तत्त्वज्ञानाची संगति नाहीं; म्हणजे ती निर्माणच होणार नाहीं असें मानणें चुकीचें ठरेल. परंतु जीवनाची अधिक सुस्पष्ट जाणीव व अनुभूतीची–यांत कल्पनानिष्ठ अनुभवा-( Imaginative experience )–चाहि अंतर्भाव आहे–व्यापकता या दोन गोष्टींची वाचकाची अपेक्षा मात्र कवीनें पूर्ण केली पाहिजे.

'आर्द्रे' कडून 'स्वेदगंगे'कडे आपण वळलों कीं [illegible]ींच्या मनोवृत्तींतील फरक आपल्याला चट्कन् जाणवतो. [illegible] आपलें मनोगत उपरोधानें व्यक्त करतात, तर श्री. करंदीकर हे आपल्या प्रत्येक कल्पनेचें आवेशानें प्रतिपादन करतात. 'आर्द्रा' वाचतांना कोठें तरी कांहीं तरी उणें आहे ही सल वाचकांच्या मनाला लागते, तर श्री. करंदीकर यांच्या काव्यांतील जिवंतपणा व ओज यांचा वाचकांच्या मनाला चट्कन् स्पर्श होतो. श्री. करंदीकरांच्या काव्यांत समाजवादी मनोवृत्तीचा उत्कटतेनें प्रत्यय येतो. दलितांबद्दल त्यांना सहानुभूति वाटते, व या श्रमिकांच्या स्वेदगंगेंतून नवें जग निर्माण होईल असा त्यांना विश्वास वाटतो.

'स्वेदाची ही अखंड गंगा
खणीत डोंगर भरीत डबरे
समान करुनी भंवतीं सारें
... धुळीस मिळवी जुलमी गादी'

या ओळींतील ओघ हा केवळ शब्दांचा नसून कवीला 'स्वेदगंगे'बद्दल वाटणाऱ्या आत्मीयतेंतून निर्माण झाला आहे. 'देश धर्म रक्त' यांचीं धरणें ही स्वेदगंगा फोडील असा दुर्दम्य आशावाद कवी-जवळ आहे. या आवेशांतून सहज स्फुरलेली कविता हृद्य असणारच, परंतु ती जर सहजस्फूर्त नसेल तर तिला प्रचारकी थाट येऊन तिच्यांतील कलागुण कमी होतो. 'मजूर' या कवितेंत

"मजुरांच्या हाडांचा येथें जळतो अंगार सदा
मजुरांच्या घामाच्या वाफेवर फिरती हीं यंत्रें"

अशा अनेक ओळी आहेत. या कवितेंत हा कल्पनांचा फुलोरा मुद्दाम आणलेला आहे. सर्वसामान्य जनसमुदायाच्या भावनांना आवाहन करण्यासाठीं राजकीय कार्यकर्ता ज्या प्रतिमां ( Images )-चा उपयोग करील त्या प्रतिमा काव्यामध्यें अतिरंजितच वाटतील. सूचक कल्पनांच्या साहाय्यानें वाचकाच्या कल्पनाशक्तीला चालना देऊन अपेक्षित हेतु साध्य करणें हाच कवीचा प्रयत्न असला पाहिजे. या सूचकतेच्या अभावामुळें 'संजीवनी मंत्र', 'आवाहन', 'होळी' या कविता कलादृष्ट्या अगदीं हिणकस वाटतात. क्रांतीचा सतत कंठरव रसिक वाचकाला असह्य होतो. 'जीवितकोंडी', 'पुनर्मीलन' या आंतर भावनांचें चित्रण करणाऱ्या कविता मात्र सुंदर साधल्या आहे. प्रत्येक घटना [illegible] देण्याचा मोह श्री. करंदीकरांना टाळतां येत नाहीं. 'रक्त समाधि' सूचक प्रतीकांच्या साहाय्यानें अधिक परिणामकारक करतां आली असती.

वाङ्मयांत कोणताहि पंथ निघाला कीं त्याची विशिष्ट परिभाषा बनत असते. नवकाव्यांतहि 'रक्त', 'अश्रु' 'दिक्काल' ही परिभाषा एकसारखी येते. त्याचप्रमाणें कांहीं कवींना विशिष्ट ध्वनि असलेले शब्द अर्थवाही ठरतील असें वाटतें. समर्पक रीतीनें या शब्दांचा उपयोग केला तर अर्थनिष्पत्ति अधिक चांगली होते हें खरें, पण कित्येकदां एका नव्या संकेताच्या आहारीं कवि गेल्यामुळें निर्माण झालेल्या अर्थशून्य ओळीहि वाचकाला वाचाव्या लागतात. 'मजूर' या कवितेंत श्री. करंदीकर यांनीं 'झग झग झग झग झग झग' ही ओळ अशीच लिहिली आहे. बालवाङ्मयांत यशस्वी ठरणारे हे शब्द उगाचच नवकाव्यांत न येतील तर बरें.

श्री. करंदीकरांनीं आपल्या काव्यांत कांहीं शब्दचित्रें रेखाटलीं आहेत. हीं शब्दचित्रें वास्तव आहेत व कवीची वर्णनशैलीहि वेधक आहे. परंतु ही वर्णनपर कविता वाचकांच्या मनावर कोणताहि परिणाम करूं शकत नाहीं. गोल्डस्मिथनें आपल्या भग्न खेड्याचें वर्णन करतांना ज्या व्यक्तिरेखा रेखाटल्या आहेत, त्या प्रातिनिधिक असून भग्न सामाजिक जीवनाचें आर्त सूर त्यांच्या वैयक्तिक जीवनांत भरून राहिले आहेत. अशा तऱ्हेची सामाजिक जीवनाची पार्श्वभूमि नसल्यामुळें 'कीर्तन' ही



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कविता अयशस्वी झाली आहे. कांहीं वेळां वर्णनाच्या ओघांत वाहवल्यामुळें कवितेच्या एकसूत्रीपणाला बाध येतो. 'साक्षात्कार' या कवितेंत ऐतखाऊ भटजी व श्रमणारी पाटावरवंटावाली यांची विरोधी चित्रें कवीला वाचकाच्या मनापुढें उभीं करावयाचीं आहेत. परंतु त्या स्त्रीचें वर्णन करतांना कवीनें तिच्या अंगोपांगांचें इतकें वर्णन केलें आहे कीं त्यामुळें वाचकाला श्रमदेवीपेक्षां दुसराच साक्षात्कार होतो.

'दगडांतून देवाकडे' या दीर्घ कवितेंत कवीनें आपल्या जीवितविषयक दृष्टिकोनांत होणारा बदल व आपल्या मनाच्या वेगवेगळ्या अवस्था व्यक्त केल्या आहेत. या कवितेंतील प्रामाणिकपणा व तळमळ मनाला चटकन् जाणवते. परंतु हेंच हृद्गत अधिक मोजक्या शब्दांत प्रभावी रीतीनें व्यक्त करतां आलें असतें.

श्री. करंदीकरांची प्रतिभा ही ओजस्वी आहे. त्यांची जीवनदृष्टि निरोगी व आशावादी आहे. संयम व सूचकता त्यांच्या काव्यांत अधिक आल्यास महाराष्ट्रांतील नवकाव्यांत मोलाची भर पडेल.

मराठींतील तरुण कवींच्यामध्यें कांहीं कवींच्या काव्यांत जीवनाचे नवे उन्मेष व्यक्त होत आहेत; त्याचप्रमाणें कांहीं कवि तांबे किंवा रविकिरण मंडळांतील कवी यांची परंपरा चालवीत आहेत. प्रा. वि. म. कुलकर्णी ('पहांटवारा') यांनीं कांहीं 'नवकविता' लिहिल्या असल्या तरी त्यांची वृत्ति मुख्यतः रविकिरण-मंडळाच्याच परंपरेंतील आहे. निसर्गांतील मनोहर दृश्यें, जानपद जीवनांतील रम्य क्षण, कौटुंबिक आयुष्यांतील स्नेहपूर्ण क्षण यांनींच श्री. कुलकर्णी यांचें भावजीवन प्रामुख्यानें व्यापलेलें आहे. 'श्रमदेवता', 'घंटांची किणकिण', 'वेडी आस', 'माझा उजळ उंबरा' या कविता कोणाहि रसिकाच्या मनाला मोह पाडतील. उत्कट भावना हें या कवितांचें वैशिष्ट्य नाहीं. श्री. कुलकर्णी हे सौम्य प्रकृतीचे कवि आहेत. परंतु निर्मल निरागस आनंद लालित्यपूर्ण शैलीनें व्यक्त करण्यांत मात्र ते फार यशस्वी आहेत. 'लमाणांचा तांडा' ही या संग्रहांतील सर्वोत्कृष्ट कविता आहे. तांड्यांतील एका लमाण स्त्रीच्या कांठीच्या टोकाला एक राघूचा पिंजरा आहे. त्यासंबंधीं कवि म्हणतो :

"अस्थिर संसारीं विकीर्ण जीवन
त्यांत एकली ही कोमलता-खूण !
... तेवढीच तिच्या आत्म्याची ओळख"

कवीच्या पुरोगामी दृष्टिकोनाची खात्री पटण्यासाठीं त्यांनीं विशिष्ट तऱ्हेच्याच कविता लिहिल्या पाहिजेत अशी मागणी टीकाकार करूं शकत नाहीं व त्यामुळें कवीनें अळेंबळें तशा कविता लिहिण्याचेंहि कारण नाहीं. 'समाधान' ही कविता अशा तऱ्हेची आहे. हृदयावर मर्मीं घाव घालील असा उपहास करण्याचा श्रीं. कुलकर्णी यांचा स्वभाव नाहीं, त्यामुळें या कवितेंतील उपरोध अगदीं दुबळा वाटतो. श्री. कुलकर्णी यांच्या कणिकाहि अशाच सामान्य आहेत. कणिका किंवा चुटके यांना अतिशय तल्लख उपरोधाची आवश्यकता असते. श्री. सप्रे यांच्या 'अर्धचंद्रां'त ही चमक होती. श्री. करंदीकर यांनीं लिहिलेले 'हेमगर्भा' सारखे एकदोन चुटके चुरचुरीत आहेत. परंतु नर्मविनोद करूं पहाणाऱ्या श्री. कुलकर्णी यांच्या कविता वाचकाच्या मनाची पकड घेऊं शकत नाहींत. ज्या जीवनाबद्दल श्री. कुलकर्णी यांना जिव्हाळा वाटतो त्याचेंच चित्रण त्यांच्या काव्यांत अधिक उत्कटतेनें झाल्यास त्यांच्या प्रतिभेचा खरा विलास रसिकांना पहावयास मिळेल.

हे तीनहि संग्रह वाचले म्हणजे 'मराठीं'तील नव्या कवींचें काव्य नवप्रत्ययानें भरूं लागलें आहे या आचार्य भागवतांच्या उद्गारांची सार्थता पटते. या काव्यांत केव्हां वैफल्याचा सूर असेल तर केव्हां आशावादी तत्त्वज्ञानाचे पडसाद असतील. त्यांत अंगावर शहारे येतील अशीं कांहीं प्रतीकें वापरलेलीं असतील किंवा सुंदर कल्पनांचा मनोहर विलास असेल. परंतु एक गोष्ट मात्र निश्चित कीं गतानुगतिकतेचा त्याग करून वास्तव सृष्टींत भरारी मारण्याचा प्रयत्न नवकवींची प्रतिभा करीत आहे. या प्रयत्नांत कांहीं कवींच्या प्रतिभेचे पंख गळून पडतील पण या प्रयत्नांतूनच जिवंत काव्य निर्माण होईल.

—ग. प्र. प्रधान



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सारसंकलन

## पं. माखनलाल चतुर्वेदी

हिंदीचे चतुरस्त्र लेखक पं. माखनलालजी यांच्या वयाला नुकतींच साठ वर्षें पुरीं झालीं.

त्यांच्या हरिकजयंतीनिमित्त अकोल्याच्या "मानवता" या हिंदी मासिकानें खास अंक प्रसिद्ध केला आहे व त्यावरूनच पुढील माहिती उद्धृत केली आहे.

त्या प्रसंगाला अनुलक्षून पूज्य विनोबांनीं खालील-प्रमाणें प्रशस्तिपर संदेश "संगम" व "मानवता" या नियतकालिकांना पाठविला होता:

"माखनलालजी एक उत्तम लेखक और कविकी हैसियत से हिन्दी जगत में विश्रुत है। लेकिन उससे बढकर मेरे लिये वे एक सज्जन हैं। उनकी सौजन्य की छबि, जो उनके चेहरेपर प्रकाशित हैं, उनकी कवित्वशक्ति को भी मात करती है।"

श्री. माखनलालजी साहित्याच्या गद्य व पद्य अशा दोन्ही शाखांतील सव्यसाची लेखक आहेत. "साहित्य-देवता" नामक ग्रंथांत त्यांचें गद्य लेखन संग्रहीत झालें आहे. ते हिंदीचे एक अनुपम गद्य शैलीकार मानले जातात. कवितांचे "हिमकिरीटिनी" व "हिमतरंगिणी" हे दोन संग्रह प्रसिद्ध आहेत. 'त्यांनीं हिंदींतील राष्ट्रीय कवितेला बलिदान, मरणाचा आदेश, तारुण्य आदि गुणांचें प्रदान केलें आहे.' उर्दू साहित्यांतील शाहिरी आत्मा त्यांत खूप विलसत आहे.

पं. माखनलालजींचें साहित्य लोकाभिमुख आहे; ते संघर्षवादी आहेत. साहित्यानें लालित्याचा पडदा उभारून वास्तवाकडे तोंड फिरवावयाचें असें आतां चालणार नाहीं असा त्यांचा दृढ विश्वास आहे. आतां साहित्यानें जीवनाच्या झगड्याचें चित्रण केलें पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. साहित्य पलायन-वादी न राहतां संघर्षाभिमुख व्हावें म्हणून त्यांची तळमळ चालू असते. अखिल भारतीय प्राच्यविद्या-परिषदेंतील आपल्या "युग और कला" या भाषणांत त्यांनीं म्हटलें आहे :

"संघर्ष, शोध, खांचखळगे, परिवर्तन, क्रिया-शीलता आणि पुरुषार्थ या सर्वांच्या मध्यें आमच्या प्राणवान् कलेचा स्वर प्रतिबिंबित झाला पाहिजे. आमची कला जांभयांसारखी अल्पप्राण असतां कामा नये. ती श्वासाप्रमाणें महाप्राण झाली पाहिजे. जवळजवळ ७ शतकांनंतर भारतीय स्वातंत्र्याची तुटलेली सांखळी पुन्हा सांधली आहे. या सांखळीच्या सांध्याचा स्वर आमच्या कलेंत प्रतिबिंबित झाला पाहिजे. मला एकच गोष्ट सांगावयाची आहे आणि मी एकच गोष्ट सांगितली आहे कीं, प्रभु करो आणि जिच्या आकर्षणानें मुरलीधर कृष्ण प्रभावित झाला असें म्हटलें जातें त्या आराधिका राधिकेच्या स्वरांची क्रीडाभूमि माझे मस्तक बनो, जीवन आमचा कृष्ण होवो, कला आमची राधिका होवो. आम्ही असे तीर्थयात्रिक व्हावें कीं जे आपल्या देवाच्या मस्तकीं आपल्या-जवळील समस्त कांहीं चढवूं शकतील, त्याच्या चरणीं आपलें सर्वस्व अर्पण करूं शकतील."

## अक्षर साहित्याचा प्राण

श्री. रवीन्द्रनाथांना श्री. शरच्चंद्र चट्टोपाध्यायांच्या साहित्यिक प्रतिभेबद्दल फार आदर होता. तद्वत् श्री. शरद्बाबूंनाहि रवीन्द्रनाथांच्या मताबद्दल आस्था होती. रवीन्द्रांनीं शरद्बाबूंच्या "पथेर दाबी" ('सव्यसाची') व "षोडशी" (भैरवी) या पुस्तकांबद्दल जें पत्रांत लिहिलें आहे त्याचा गुजराथी अनुवाद "संस्कृति" (एप्रिल १९५०) मध्यें आला आहे. "षोडशी"च्या निमित्तानें रवीन्द्र-नाथांनीं लोकानुगामी साहित्य व चिरलक्षी साहित्य यांबाबतचीं आपलीं मतें पुन्हां एकदां मांडलीं आहेत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अक्षरसाहित्याचा प्राण कशांत आहे हें त्यावरून उत्तम प्रकारें लक्षांत येण्यासारखें आहे. टागोर शरद्‌बाबूंना लिहितात :

" अंतरींची प्रकृति आणि बाहेरची आकृति यांचें जेव्हां खरेंखुरें मीलन होतें तेव्हां चरित्रचित्र खरें तयार होतें. माझी खात्री आहे कीं तुमची लेखणी बरोबर चालली तर या रूपाबरोबर भावाचाही मेळ तिला घालतां येईल. कारण तुमच्यांत निरीक्षणाची दृष्टि आहे, विचार करणारें मन आहे. त्याशिवाय या देशच्या लोकजीवनासंबंधींचें तुमचें अनुभवक्षेत्र विशाल आहे. तुम्ही जर वर्तमानकालाची मागणी आणि जमावांतील लोकांची अभिरुचि हीं विसरूं शकणार नसाल तर ( मात्र ) तुमची शक्ति बाधित होईल. सर्वच महान् साहित्याचें परिदर्शन (perspective) दूरव्यापी असतें. त्याचबरोबर प्रमाणबद्धता आली तरच साहित्य टिकून राहूं शकेल. जवळच्या लोकांचा कोलाहल जेव्हां भिंत बनून साहित्याला संकुचित कुंपणांत अवरोधून धरतो तेव्हां तें ( साहित्य ) असत्य बनतें.

"...मला माहीत आहे कीं मी हें म्हटल्यामुळें तुम्हांला राग येईल, पण तुमच्या प्रतिभेबद्दल मला विश्वास आहे म्हणूनच माझा अभिप्राय मी सरळ मनानें कळवीत आहें. साहित्यांतील तुम्ही मोठे साधक आहांत. तुम्ही ( " षोडशी " लिहून ) चालू काळाकडून बक्षीस मिळवून खुष होऊं शकाल, पण तुम्ही सर्वकालासाठीं काय ठेवून जाणार आहांत ?

" तुम्ही लिहिलें आहे कीं, ' वर्तमान काळ ही सुद्धां एक महान् वस्तु आहे.' वर्तमानकाळ तेव्हांच खरोखर महान् असेल जेव्हां भावी काळांतहि त्याला प्रवेशाधिकार मिळेल. वर्तमानकाळाचा एक मोठा भाग क्षणजीवींचा आहे. आधुनिक ' डेमॉक्रसी 'च्या युगांत साहित्याच्या दरबारांत हे क्षणजीवी उंच आवाज़ांत फरमाईश करीत असतात. ही फरमाईश कशी टाळावी ही आजच्या काळांतील एक कठिण समस्या आहे....तुमच्यासारख्या साहित्यकारानें या जमावाला असें सांगितलें पाहिजे कीं 'तुमच्या घोषणा त्या माझ्या घोषणा नव्हेत; तुमच्या पिंजऱ्यांतील पांखरूं झालों नाहीं तर तुमच्याकडून दाणापाणी मिळायचें माझ्या नशिबांत नसेलहि; पण माझें खाद्य विशाल देशांत व विशाल कालांत आहे...' मीं तुमच्या ज्या गोष्टी वाचल्या आहेत त्यांत तुम्ही अत्यंत अनायासें चिरकालीन सत्य मूर्तिमंत उभें केलें आहे...तेव्हां तुम्ही जमावापासून दूर होता. पण तुमचें सध्यांचें लेखन वाचल्यावर मला भीति वाटूं लागली आहे कीं तुमच्या लेखणीवर तुम्हांला कळत नकळत जमावांतील लोकांचें मन तर नाहींना स्वार होऊन बसलें ? यानें एवढें मोठें नुकसान होणार आहे कीं तें मी उघड्या डोळ्यानें पाहूं शकत नाहीं.

" एक गोष्ट लक्षांत ठेवावी : मीं तुमच्या या पुस्तकासंबंधीं जें मत व्यक्त केलें आहे तें तुम्हांला असंबद्ध वाटत असेल तर तें साफ पुसून टाका. तुमचा स्वतःचा निर्मितीविषयींचा आदर्श तुमच्या स्वतःच्याच मनांत असेल. जर तुम्ही तो सांभाळीत असला तर मला कांहींच म्हणावयाचें नाहीं. जर सामान्य जनतेची फर्माइश तुमच्या लेखणीला विचलित करीत असेल तर मात्र चिंता करावयाला कारण आहे खरें. "

## संतकवि रविदास

" संतनमें रविदास संत है
पंथखबर सोही जानै "

आचार्य क्षितिमोहन सेन यांच्या संत रविदासासंबंधीं-च्यीं एका लेखाच्या अनुवादावरून ( " सत्यकथा " एप्रिल १९५० ) भारतांतील एका अतिशूद्रजातीय संतश्रेष्ठाचा परिचय आपणांस होतो. संत रविदासांच्या साधनेची महत्ता थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे :

" महापुरुष रामानंदांचा शिष्य जसा कबीर होता तसाच रविदासहि त्यांचा शिष्य होता. कदाचित् रविदासाचें नांव कित्येक लोकांना माहीत असेल; पण त्यांचा खरा परिचय फारच थोड्यांना असेल. आपण ज्याला तत्कालीन इतिहास म्हणतों तसें कांहीं या साधुसंतांच्या मनीं नव्हतें.

" रविदासाच्या साधनेची नौका जर एखाद्या चिखलाच्या मार्गानें गेली असती तर त्यांच्या त्या साधनेचीं चिन्हें—आपण ज्याला इतिहास म्हणतों तीं—आपणांला मिळालीं असतीं; पण ज्या खोल पाण्यांत त्यांची साधननौका सहजीं शीड उभारून गेली होती त्याचें चिह्न कांहीं मिळत नाहीं. आपणांला जो इतिहास मिळतो तो तर मोठमोठ्या खुनी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

गुन्हेगारांचा, मोठमोठ्या लुटारूंचा असतो ! ज्यांनीं खरोखर मानवसंस्कृतीची घडण केली अशा कित्येकांचा परिचय तथाकथित इतिहासांत आपणांला कोठें आढळतो ?

" यामुळें कबीर, रविदास यांसारख्या मोठ्या साधकांचा वृत्तांत आपणांला मिळत नाहीं. असें असूनहि कबीराच्या गोष्टी बऱ्याचशा माहितीच्या आहेत. पण रविदासाच्या आध्यात्मिक ऐश्वर्याच्या फारच थोड्या गोष्टी आपणाला ठाऊक आहेत.

" रविदास हळूंहळूं क्रमाक्रमानें साधनेच्या मार्गांत येणारे कांटे दूर करीत आपल्या मुक्कामाला जाण्यासाठीं पुढें पुढें चालला होता. नैतिक मार्गांतील अनेक दुःख-द्वंद्वांची त्याला माहिती होती. मानवाची सेवा व कर्म करतांना त्याला कधीं थकवा येत नसे. त्यामुळें अनेक लोकांच्या साधनमार्गांतील दुःख दूर करून तो त्यांना प्रोत्साहन देत असे.

" रविदासाच्या साधनेंतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट मानवसेवा होती. त्या वेळीं पुष्कळ ठिकाणीं साधक संतांचीं संमेलनें भरत. अशा ठिकाणीं, तसेंच मोठमोठ्या मेळ्यांमध्यें म्हातारे, रोगी, अपंग वगैरेंची सेवा करतांना तो थकत नसे. त्याचें हृदय नेहमीं तरुण असे, म्हणून तरुणांवर त्याचा फार प्रभाव पडे. कित्येकांना वाटे कीं त्यानें युवकांचीं डोकीं विनाकारण भिकविलीं आहेत. परंतु या युवकांच्या संगतींत राहून त्यानें मानवसेवेचें जें माधुर्य अनुभविलें आहे त्याचा रसास्वाद आपणांला त्याच्या अनुपम 'सेवेची पंचप्रणति' या भजनी वाणींत मिळतो.

" एकट्या युवकांवरच कशाला, राजपुतान्यांतील महाराणीवशांतहि त्याच्या साधनेच्या शक्तीचा प्रभाव पडला होता. कदाचित् इतिहासाचा ताळा जुळविणें कठिण गेलें तरी भक्तलोकांत ही गोष्ट अतिशय प्रसिद्ध आहे कीं मीराबाई रविदासाची शिष्या होती. जसे शंकराचार्यानंतरचे आचार्य शंकराचार्य म्हटले जातात, नानकानंतरचे गुरु नानक म्हटले जातात, मीरेचे अनुयायीहि स्वतःला मीरेच्या नांवानेंच ओळखतात, तसेंच रविदासाचे अनुयायीहि रविदास नसतील ना ? गोष्ट अशी आहे कीं, त्याच्या साधनेच्या द्वारें नवजीवन प्राप्त झालें असल्यामुळें मीरानें वारंवार म्हटलें आहे कीं 'रविदासाला मीं गुरु केलें आहे.'

" त्या काळीं जेव्हां सामाजिक बहिष्कार अस्तित्वांत होता तेव्हां चांभाराच्या घरांत जन्मूनहि रविदासानें मानवमनाचा महिमा कसा प्राप्त करून घेतला याचा विचार करतां आश्चर्य वाटतें; आणि असें असूनहि त्यानें जीवन कंठलें गृहस्थाचें. आजीविकेचें साधन मानलें आपला धंदा आणि कशी कोणाला ठाऊक, पण मानवमहिम्याला केव्हांहि आंच लागूं दिली नाहीं.

" एका बाजूला त्याचें निर्भय भावाचें सरळ खरें मत, आणि दुसऱ्या बाजूला चांभाराच्या घरीं जन्म; या दोन्ही गोष्टींमुळें त्याचा मार्ग कांट्याकुट्यांनीं भरून टाकला होता ही गोष्ट निर्विवाद होय. मागाहून जरी कित्येकांनीं जुळवून दिलें कीं, तो पूर्वजन्मीं ब्राह्मण होता व या जन्मीं त्याच्या कातडीखालीं सुवर्णाचें जानवें होतें, तरी पण त्यानें स्वतः मात्र खरी गोष्ट जोरानें सांगितली आहे; इतकेंच नाहीं तर त्या वेळीं भ्रमांत सांपडलेल्या समाजबुद्धीवर आघात करण्यासाठीं त्यानें ती वारंवार सांगितली आहे :

जाती ओछा, पाती ओछा
ओछा जनमु हमारा

( बाबा, मी जातीनें नीच आहें, माझी पंक्तिहि नीच आहे; आणि जन्महि नीच कुळांत झाला आहे. )

" आणखी असें सांगतात,

" बिखु अंमृतु बसहि इकसंगा "

विष व अमृत यांना त्यानें एकत्र पाहिलें. तेंच रविदासाचें दिव्यदर्शन होतें. त्याला दिसलें कीं या जीवनांतहि रक्तमांसाची कामना व दिव्यभाव, हीनता व उच्चता एकत्र वास करीत आहेत. त्याचा जन्म नीच चांभार कुळांत झाला होता, पण त्याच्या अंतरांत चिन्मय ब्रह्मध्यान होतें. जीवनांत आपणाला अशा प्रकारचा 'चांडाल-विप्र'-योग जिथें तिथें आढळतो. प्रत्येक मानवांत असलेली रक्तमांसाची कामना ही चांडाल आहे आणि भागवत भावना ही ब्राम्हण आहे. असा 'विप्र-चांडाल' योग कोठें नसतो ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

" रविदासाचें अपूर्व संगीत अजूनहि साधुसंतांमध्यें जिवंत आहे. दिवसेंदिवस तें लुप्त होत चाललें आहे. ह्या सर्व गोष्टी कशा सांगाव्या ? येथें त्याचें एक फक्त गान देतों. त्याचें हें वसंत उत्सवाचें गीत ग्रंथसाहेबांतहि आहे. तेंच गान मी निराळ्या स्वरूपांत भक्तांच्या कंठांतून ऐकलें आहे. या गानाची भावसंपत्ति व कवित्वाचें ऐश्वर्य अद्‌भुत आहे !

" आज वसन्त फूलफूल फूले वसन्त सब दिस,
तजि कृपनाई सब डूबौ प्रेमि अहनिस.
आजु जागु व्याकुल मन मेरे मिलहु प्रेम सुहागु,
तरु बन सब फूलत है लागु प्रीतम संग लागु.
फीकी सूखी आज कछु नाहि आज सबरस उमंग,
काहे उदास रविदास आजदिन लागु लागु पिय संग"

### श्रीतुकाराम-चरित्राचें संशोधन

मोठमोठ्या संतांच्या जीवनांतील अनेक प्रसंगांबद्दलची खरीखुरी माहिती आपणांस मिळत नाहीं. संत रविदासाच्या बाबतींत वर जें आलें आहे तेंच तुकारामाच्या बाबतींतहि खरें आहे. प्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. वा. सी. बेन्द्रे यांनीं एका लेखांत (" सह्याद्रि, " मार्च १९५०) या प्रकारावर खूप प्रकाश पाडला आहे. त्यांतील कांहीं महत्त्वाचे मुद्देच फक्त पुढें दिले आहेत:

श्री. पांगारकरांनीं जुन्या ऐतिहासिक कागदांचा नीट अभ्यास-न करतां तर्कानें शब्द भरून अर्थ काढला आहे. तुकारामाच्या जातीबद्दल त्यामुळें फार घोंटाळा माजला आहे. पांगारकरांनीं " ज्ञा (त) कुनबी वाणी " असा मजकूर मुळांत नवीन " घुसडला " असें श्री. बेन्द्रे म्हणतात. तुकारामाची जात वैश्य एवढाच उल्लेख आढळतो. अभंगांत वैश्यकर्मालाच प्राधान्य आहे. ' शूद्र ' ' हीनयाति ' याचा अर्थ ब्राह्मणांहून अन्य ते शूद्र हीन असा घ्यावयाचा, कारण कलियुगांत फक्त ब्राह्मणवर्णच टिकणार व बाकीचे शूद्र होणार असें भविष्यच ब्राह्मणी पुराणांनीं वर्तविलें आहे ! बहिणाबाई, रामेश्वर वगैरे समकालीन लेखक तो ' वैश्यवाणी ' असल्याचेंच लिहितात.

आडनांवाच्या बाबतींत असाच घोटाळा आहे. तुकारामाचे वंशज " मोरे " आडनांव लावतात, पण तत्कालीन कागदपत्रांत " आंबिले " एवढाच उल्लेख आहे. " आंबिले मौर्यकुळी " असा उल्लेख बुवांच्या मुलाच्या (नारायणबुवांच्या) नोंदींत आहे हें खरें. याच नोंदींत पांगारकरांनीं वरील शब्द घुसडून अधिक घोंटाळा माजवला.

घराण्याचें कुलदैवत विठोबा होतें हें तुकारामाच्याहि पूर्वीपासून होतें. हें या कुटुंबाचें वैशिष्ट्य आहे. विठ्ठल कुलदैवत तेव्हां फारसें कोणाचें नव्हतें. या ' विठ्ठल देउ ' साठीं बागाईत जमीन (विठ्ठलटिकें येथील) पूर्वींच इनाम मिळालेली होती.

नामस्मरणाचा महिमा गाणाऱ्या तुकारामानेंहि जपतपादि साधना केली असल्याचे उल्लेख आहेत. देहूजवळील भामचंद्राच्या डोंगरावर भामचंद्र महादेव व बुद्धमूर्ति यांच्या सान्निध्यांत त्यानें ही साधना केली. नंतर देहूस हा उपासनामार्ग चालूच ठेवला होता.

तुकारामाच्या ' कीर्तना ' संबंधीं कांहीं आख्यायिका बिनआधाराच्या आहेत. खरोखर कोणा ' टाळकरी ' गटाचें लक्ष तुकारामाच्या कुटुंबाकडे फारसें गेल्याचें दिसत नाहीं. स्वतः तुकारामांना एकान्तवासच प्रिय होता. लोकांत जाऊन, शिष्यपरिवार जमवून, ' टाळकऱ्यां ' सह पारंपरिक कीर्तन करणें त्यांना शक्य नव्हतें. भजनचिंतनाचा अर्थ ' दिंडीचा गजर ' नव्हे, आणि उल्लेख फक्त एवढाच आढळतो. म्हणून कांहीं अभंगांचा संबंध ' कीर्तना ' कडे लावून कांहीं प्रसंग त्यांत ध्वनित आहेत असें सांगण्याचा भाविकांचा उपक्रम (ऐतिहासिक सत्यतेच्या दृष्टीनें) घातुकच आहे...उदाहरणार्थ, कीर्तनाच्या वेळीं शिवाजी आला होता व त्याच वेळीं परचक्र आलें ही दंतकथा अशीच आहे. शिवाजीनें इनाम देऊं केल्याच्या दंतकथेला आधार नाहीं. फक्त २ पत्रें देहूगांवासंबंधीं उपलब्ध आहेत. शिवाय इ. स. १६५० पर्यंत देहू, लोहगांव व पुणें या भागांत शिवाजीच्याच सनदा व अंमल अव्याहत चालू असल्याचें कागदपत्रांत स्पष्ट आहे. तेव्हां अशा भागांत एकदम परचक्र म्हणजे यवनांचा हल्ला होणें सुतराम् अशक्य. या परचक्राचा आध्यात्मिक अर्थ लावणेंच श्रेयस्कर.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## राष्ट्रभाषेचें भयस्थान

गुजरातचे विख्यात शिक्षणतज्ज्ञ व राष्ट्रभाषा-प्रचाराचे नेते श्री. मगनभाई देसाई यांनीं राष्ट्रभाषे-बाबत कांहीं स्पष्टोक्ति अहमदाबाद शहर काँग्रेसनें सुरू केलेल्या राष्ट्रभाषावर्गांपुढें भाषण करतांना केली आहे. त्याचा सारांश "शिक्षण अने साहित्य" (एप्रिल १९५० मध्यें) आला आहे. श्री. मगन-भाई देसाई म्हणतात :

"राष्ट्रभाषेसंबंधींच्या सर्व (मूळ) चळवळीचा पाया असा होता कीं, ती भाषा इंग्रजीच्या स्थानाची प्रतिस्पर्धी आहे, कोणत्याहि प्रांतभाषेची नव्हे; म्हणजे राष्ट्रभाषा कोणाहि प्रांतभाषेचें नैस-र्गिक स्थान किंवा तिचा जन्मसिद्ध हक्क हिरावून घेणार नाहीं.

"राष्ट्रभाषेच्या उक्त कार्यांत कोणा प्रांतावर यू. पी. च्या भाषेची कोणी अभिमानी संस्था किंवा वर्ग यांचें वर्चस्व असतां कामा नये. ही गोष्ट खास सांभाळून १९१८ पासून गांधीजींनीं कार्य केलें...आतां या भीतीचीं अन्य कारणें-हि उत्पन्न झालीं आहेत. (प्रांतवाद किंवा भाषा-वाद माजण्याचें भय गांधीजींनीं हेरलें होतेंच). ज्यांच्या मतें उच्च शिक्षणाचें माध्यम सबंध देशांत हिंदी असलें पाहिजे, अशा मताचे कांहीं लोक आज दिसत आहेत.

"म्हणजे हा तर प्रांतभाषांचा स्पष्ट अनादर झाला, आणि त्यांना आह्वानच झालें. हे लोक प्रांतांतच आंतरिक विवाद माजवतील आणि परिणामीं राष्ट्रभाषेचीच शक्ति व वाढ खुंटेल.

"इंग्रजीऐवजीं हिंदी-हिंदुस्तानी मध्यसरकार-ची भाषा बनणार म्हणजे नोकरीसाठीं आज इंग्रजीला जो भाव आहे तसाच हिंदी–हिंदुस्तानी-लाहि येणार. याचा परिणाम शिक्षणाच्या क्षेत्रांत मातृभाषेवर कसा काय होणार, तें आपणाला इंग्रजीच्या कामगिरीवरून बरोबर कळून आलें आहे. तसली चूक हिंदीच्या नांवेंहि पुन्हां होतां कामा नये...याचा गैरवाजवी लाभ घ्यायचें हिंदीभाषी लोकांनीं आपल्या मताच्या जोरावर ठरविलें तर त्यांत राष्ट्रभाषेचेंच कार्य बिघडेल आणि इंग्रजीला अधिक जीवदान मिळेल.... प्रांतवाद, हिंदी माध्यमवाद, हिंदुवाद व जीर्णोद्धारवाद वगैरे अनिष्टें जर बेबंद राहिलीं तर घटनासभेनें ठरविलेलें राष्ट्रभाषेचें स्वरूप विकसूं शकणार नाहीं. गांधीजींनीं हिंदी–हिंदुस्तानीच्या कार्याला फार महत्त्व दिलें होतें आणि त्याचें त्यांनीं या देशाच्या नवनिर्मितीच्या कार्याचा एक आधार-स्तंभ असें वर्णन केलें होतें..."

## 'नवी जीवननिष्ठा'

श्री. ना. ग. जोशी यांचा 'विश्वमानव' हा काव्यसंग्रह नुकताच साहित्यसंमेलनांत प्रकाशित झाला आहे. ह्या काव्यसंग्रहाला आचार्य स. ज. भागवत यांची प्रस्तावना असून त्या प्रस्तावनेंत त्यांनीं विश्वमानवाच्या तात्त्विक भूमिकेचा परामर्श घेतलेला आहे. त्या प्रस्तावनेंतील कांहीं उद्बोधक उतारे पुढें दिले आहेत :

"आधुनिक युगानें माणसाच्या हातीं भौतिक ज्ञानाचें अलौकिक भांडारच दिलें आहे यांत शंका नाहीं. विज्ञानाच्या वाढीमुळें मानवाचें भौतिक कर्तृत्व अत्यंत विशाळलें आहे. मानवाच्या बुद्धीचा हा विकास होय. या बौद्धिक विकासाच्या दृष्टीनेंच पाहिलें तर आजपर्यंतच्या सांस्कृतिक जीवनांत अत्यंत थोर मानले गेलेले ऋषिमुनीदेखील अगदीं सामान्य प्रतीचे पुरुष ठरतील. ज्ञानी याज्ञवल्क्य आणि भग-वान् श्रीकृष्ण यांचें भौतिक ज्ञान त्या वेळच्या सामान्य शेतकऱ्यापेक्षां अधिक नव्हतें. सॉक्रेटीस आणि प्लेटो यांची स्थितिदेखील यापेक्षां निराळी नव्हती. येशू ख्रिस्त आणि महंमद पैगंबर किंवा गौतम बुद्ध आणि कॉन्फ्युशियस यांच्याहि बाबतींत हेंच म्हणावें लागेल. यामुळें आधुनिक युग हें पूर्वींच्या कोणत्याहि युगापेक्षां अधिक प्रगत आहे अशी समजूत झालेली आहे. धर्म आणि अध्यात्म हीं मध्ययुगीन काळांतील बुद्धिहीन खुळें आहेत, बौद्धिक ज्ञान आणि भौतिक शास्त्रें यांच्या विकासां-तच मानवसमाजाचा विकास होणार आहे, अशी कल्पना बळावत आहे. पण मानवी समाजाची सध्यांची परिस्थिति अवलोकिली तर ही कल्पना टिकूं शकेल असें वाटत नाहीं. विज्ञानयुगाच्या पूर्वीं जशी अनवस्था होती तशीच या विज्ञानयुगांतहि अनवस्थाच आहे. विज्ञानयुग बौद्धिक दृष्ट्या कितीहि प्रगत झालें असलें तरीं तें भावनेच्या दृष्टीनें मध्य



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कालीन युगापेक्षां मागसलेलेंच आहे असें म्हटलें पाहिजे. आदिमानवानें अणकुचीदार दगड हातीं घेऊन दुसऱ्याचा संहार करण्यासाठीं जी बुद्धि वापरली तिचा अनंत पटींनीं विकास झाल्याशिवाय ॲटम् बॉंबची निर्मिति होणें शक्य नाहीं हें कोणालाहि मान्य होईल. ॲटम् बॉंबनें व्हावयाचा संहार कशासाठीं व्हावयाचा आहे ? या संहारानंतर कोणतें जीवनमूल्य वा कोणता माणूस जिवंत राहणार आहे ? याचा विचारहि ज्या बुद्धींत निर्माण होत नाहीं ती बुद्धि कोठें तरी विकृत झालेलीच समजली पाहिजे. विज्ञानयुगाची या विकृतींतून सोडवणूक केल्याशिवाय मानवाला यापुढें जिवंत राहाणेंच अशक्य होणार आहे. त्यासाठीं विज्ञानयुगांतील मानवानें आपल्या बुद्धिविकासावरच विसंबून राहतां कामा नये. बुद्धीबरोबरच त्यानें भावनेचाहि विकास साधला पाहिजे.

"मानवजीवनाची परिपूर्णता प्रेमवृत्तीच्या परिणतींतच आहे आणि प्रेमवृत्तीच्या विकासासाठीं मानवाला सर्व प्रकारच्या स्वार्थी वासनांतून मुक्तता मिळवावी लागते, हा प्राचीन संतांचा अनुभव कोणत्याहि काळीं विसरण्याजोगा नाहीं. सामुदायिक मनाची वासनांतून मुक्ति घडवून आणण्यासाठीं त्याच्या न्याय्य भौतिक गरजा भागविल्या गेल्या पाहिजेत हेंहि तितकेंच खरें आहे. भौतिक ज्ञानाच्या विकासानें मानवाच्या न्याय्य भौतिक गरजा भागविणें हें उचित असलें तरी भौतिक सामर्थ्यांच्या उन्मादानें झिंगून जाण्यानें जीवनविकास साधारण नाहीं. विकास कोणता आणि विलास कोणता याचा विवेक करण्याचें सामर्थ्य मानवानें नेहमीं मिळविलें पाहिजे. मध्यकालीन युगांतील जीवनांत हा विवेक बराच आढळत असे. सध्यांच्या विज्ञानयुगांत हा विवेक बहुतेक लुप्त झालेला दिसून येत आहे. विज्ञानानें निर्माण केलेल्या नव्या शक्ती विवेकाच्या अधीन राखतां आल्या नाहींत तर विज्ञानाचें केवळ सामर्थ्य माणसाला बेहोष करील. उन्मत्त आणि आंधळें [illegible] म्हणजे केवळ आसुरी जीवन होय. मानवी जीवनाचा तो आदर्श नव्हे. विज्ञानाचें सामर्थ्य केवढेंहि असलें तरी जीवनविकासाच्या दृष्टीनें तें फक्त साधन म्हणूनच मानिलें पाहिजे. जीवनाचें तें अंतिम मूल्य नव्हे. प्रेमभावनेचा आविष्कार हेंच जीवनाचें अंतिम मूल्य झालें पाहिजे. विज्ञानयुगांतील आजच्या मानवानें या प्रेममूल्याचा निष्ठेनें स्वीकार केला तरच पूर्वींच्या युगांपेक्षांहि उच्चतर मानवी संस्कृति उद्यां निर्माण होऊं शकेल. जीवनाचें सामग्र्यानें दर्शन घेण्याची शक्ति म्हणजेच प्रेम. मानवजीवनापुरतें बोलावयाचें झाल्यास मानवजातीचे तुकडे करून न पाहातां समग्र मानवाचें दर्शन घेणें म्हणजेच मानवताप्रेम होय. मानवांची एकता भौतिक विज्ञानानें आज प्रत्यक्षांत दाखवून दिली आहे. तिचा जीवननिष्ठा म्हणून स्वीकार करण्याचें सामर्थ्य संपादण्याची आवश्यकता आज निर्माण झाली आहे. मानव तितका एकच आहे, त्याचीं सारीं सुखदुःखें समानच आहेत, या तत्त्वाची प्रतीति आल्याशिवाय मानवसमाजाचे भौतिक प्रश्न देखील सुटणार नाहींत. व्यवहारधर्माची कुटिलता जीवनांतून कायमची हद्दपार केल्याशिवाय मानवजीवनांतील कोणताहि व्यवहार यापुढें यशस्वी होणार नाहीं. उद्यांच्या नव्या मानवी संस्कृतीसाठीं आज नव्या मनाचा, नवा मानव घडविण्याची आवश्यकता आहे. हें नवें मन कोणाहि मानवाला वा मानववर्गाला वैरी समजणार नाहीं. अखिल मानवजात हें एक लहानसें कुटुंब झालें असल्यामुळें विश्वकुटुंबवाद ही आज केवळ काल्पनिक ध्येयवस्तु उरली नाहीं. आजच्या जीवनाची ती एक अपरिहार्य अनुभूतिच झाली आहे. दुर्भाग्य इतकेंच आहे कीं, ही वस्तुस्थिति आजच्या मानवाला सहज ग्रहण होत नाहीं. धर्म, ईश्वर, राष्ट्र, वंश इत्यादि मर्यादांनीं ग्रस्त झालेलें मानवाचें मन मानवजातीइतकें व्यापक होऊं शकत नाहीं. म्हणून आजच्या मानवाला मानवप्रेमाची उच्चतर दीक्षा देणारी नवी जीवननिष्ठा निर्माण करून दिली पाहिजे. या जीवननिष्ठेचा स्वीकार करूनच जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील व्यवहार चालविणारे नवे प्रयोगवीर पुढें आले पाहिजेत. नव्या युगाचा हाच नवा धर्म आहे. या धर्माचें दर्शन करून देणारें नवें साहित्यहि जन्मास आलें पाहिजे."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

